ऐसाहि भेद वदती याकरितां याकुळास ऋग्वेद २

ऋग्वेद ब्राह्मण धर्माच्या ठायीं आणि यजुर्वेद न्यायानें वर्तविणाऱ्या क्षात्र धर्माच्या ठायीं असें ह्मणतात. यास्तव ( सांप्रत कर्मसंबंधीं निश्चय करणें अवश्य म्हणून या ) क्षत्रिय कुळांस ऋग्वेदच आहे. कित्येकाचें म्हणणें ॐकार रहित क्षत्रियांनीं व्याहृती, गायत्री म्हणावी तसेच वेदमंत्र म्हणावे. याचा विचार मनुस्मृति अध्याय २ श्लोक.

अकारंचाप्युकारंच मकारंच प्रजापतिः ।
वेदत्रयान्निरदुहद्भूर्भुवःस्वरितीतिच ७६.

अर्थ–ॐकारांतील अकार. आणि व्याहृतींतील भूः ही ऋग्वेदा पासून उकार आणि भुवः ही यजुर्वेदा पासून मकार आणि स्वः ही सामवेदा पासून हीं असीं ब्रह्मदेवानें दोहिलीं ह्मणजे घेतलीं आहेत. ७६

त्रिभ्य एवतु वेदेभ्यः पादं पादमदूदुहत ।
तदित्यृचोऽस्याः साविञ्या परमेष्ठी प्रजापतिः ७७

श्रेष्ठस्थानीं राहणारा जो तो परमेष्टी असा प्रजांचा पति ब्रह्मदेव त्यांनी तत्, हें पद प्रथम ज्यांत आहे. असे तीन पाद ( प्रतीकें ) गायत्री. हीला सावित्री ह्मणतात ती.

तत् सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि ।
धियो यो नः प्रचोदयात्.

हे अनुक्रमानें पहिला ऋक्, दुसरा यजु, तिसरा साम, या वेदां पासून तीन पाद घेतले आहेत.

एतयर्चा विसंयुक्तः कालेच क्रियया स्वया ।
ब्रह्म क्षत्रिय विट् योनिर्गर्हणा यांति साधुषु. ८०

अर्थ–वरतें सांगितलेल्या ऋच्यायुक्त आपलें कर्म संध्या देवतार्चन, सायंप्रात होमादिक्रिया. यां रहित ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, जो राहील तो साधुजनांत निंदेस पात्र होईल. यावरून पाहतां ॐकार व्याहृती सहीत गायत्री ह्मणण्याचा आणि इतर यज्ञक्रिया करण्याचा अधिकार क्षत्रियास आहे. इतकेंच नाहीं, तर अवश्य केल्याच पाहिजेत नाहींतर अधर्मी

होईल. ॐकारोच्चार केला नाहीं म्हणजे वेदाचें फळ नाहीं ह्मणावें तर जो ॐकार तीच व्याहृती. जी व्याहृती तीच गायत्री. ह्मणजे तीनही वेदांचें सार आहे. तेव्हां एक न म्हणून दोन म्हणावीं हें उगाच आहे. असे होतें. मुनिवर्यात श्रेष्ठ मनु त्याचें ह्मणणें पाहिलें तर ॐकार व्याहृती सहीत गायत्री तीन वेदांतून घेतलेली ही प्रतिदिवसीं जपणें हें कर्म क्षत्रियाचें कर्तव्य [ केलेंच पाहिजे ] असें आहें. ऋग्वेयांच्या ब्रह्मयज्ञांत तीनही वेदांच्या ऋचा आहेत. अग्निमीळे० ऋग्वेद. ईषेत्वोर्जेत्वा० यजुर्वेद. अग्नआयाहि० सामवेद तसेंच मौंजीबंधन झाल्यावर ब्रम्हचर्यांत भिक्षाचरणांत. मातेनें तीनवेळ भिक्षा घालावी लागते तेव्हां तीन वेदांतून प्रत्येक वेळेस एकएक असे अनुक्रमानें तीनही वेद म्हणावे लागतात आणि गृहस्थाश्रमांत ही प्रतिदिवसीं ब्रम्हयज्ञांतही म्हणावें लागतात असा तीनही वेद पठणाचा उपयोग होतो. येथें कल्पना उत्पन्न झाली ती. चवथा वेदच नाहीं कीं काय? ही आहे. तर चवथा वेद नाहींच. तीनवेदांच्या मंत्रांनीं प्रयोग जोडिले. उपासनामार्ग मंत्र प्रयोग. हाच चवथा अथर्वण वेद होय. असे पुष्कळ आधार मिळतात. २

**वेदाध्ययन कलयुगीं अल्पायुष्यांस सर्व तें नघडे ॥**
**यास्तव श्रीव्यासानें केले षट्भेद म्हणुनि सुलभ पडे.**

कलयुगांत अल्पायुषी मनुष्यें झाल्यावर वेदाध्ययन आणि तदनुसार आचरण होणार नाहीं वेदाध्ययन कसें करावें तें मनुस्मृतींत सांगून आचारही सांगितला आहे. याज्ञवल्क्य पाराशर, यास्मृतींतही विस्तार करून सांगितला आहे तो पहा. तसें अध्ययन वेदग्रंथ १० ( संहिता १, पद २, क्रम ३, अरण ४, ब्राह्मण ५, छंद ६, निघंट ७, शिक्षा ८ ज्योतिषकल्प व ९, व्याकरण १०, ) यांचें होऊन उच्चार पद्धति जठा घनांत होणें यांस आणि त्याचा विचार करून आश्रमधर्म संपादण्यास काल अल्प ( १०० वर्षें. त्यांत आचार. आहार, निद्रा, मैथुन, मुत्र, पुरिष, शौच आणि अनाध्याय हे जातां राहतो तो ) आहे. यांत सांगोपनिषद्वेद ह्मणणें कठीण पडेल ह्मणून श्रीव्यासेनारायण यांहीं वेदाचे सहा भाग केले आहेत ह्मणून वेद ह्मणणें सुलभ पडते. ३

**जो व्यासशिष्य शाकल त्याणे जो वेदभाग स्वीकृत ती**
**शाकल शाखा झाली तीपढवीं शुद्ध क्षत्रिय व्रतती ४**

व्यासाच्या शिष्यांपैकीं शाकल नांवाचा जो शिष्य त्यानें वेदाचा जो भाग स्वत्रा-

स घेतला ती शाखा शाकल. शुद्धक्षत्रिय समूह जे ते ती शाखा पढतात. ४

# श्रीमद्भागवत प्रथम स्कंध अध्याय ४.

तत्रर्ग्वेदधरः पैलः सामगो जैमिनिः कविः ।
वैशंपायन एवैको निष्णातो यजुषामुत २१

अथर्वांगिरसामासीत्सुमंतुर्दारुणो मुनिः ।
इतिहास पुराणानां पिता मे रोमहर्षणः २२

तएत विषयो वेदं स्वं स्वं व्यस्यन्ननेकधा ।
शिष्यैः प्रशिष्यैस्तच्छिष्यैर्वेदास्ते शाखिनोऽभवन् २३

अर्थ-जें राजा परीक्षितीस श्री शुकयोगींद्रानीं सांगितलें तें सूत जो श्रीव्यासाच्या शिष्याचा [ रोमहर्षणाचा ] पुत्र त्यानें मुनिजनांस सांगितलें. श्रीमद्भागवत. यांत पहिले स्कंधाचा चवथा अध्याय.

त्यांत ऋग्वेदाचा धारणकर्ता पैल नांवाचा व्यासशिष्य, सामवेदांत मती आहे असा विद्वान जैमिनी नांवाचा; यजुर्वेदांत निष्णांत [ उत्तम समजलेला ] वैशंपायन नावाचा. आणि अथर्वण वेदाचा ज्ञाता सुमंतुनांवाचा. आणि इतिहास पुराणांचा ज्ञाता माझा पिता रोमहर्षण नांवाचा. २१।२२

इतके वेदविषयाचे ज्ञाते असून वेदांच्या शाखा केल्याते. जो ज्या वेदाचा ज्ञाता त्याच्या शिष्याहीं प्रशिष्य [ शिष्यांचे शिष्य ] तच्छिष्य [ त्या प्रशिष्यांचे शिष्य ] याहीं जे भेद कले त्या शाखा; आणि ज्याचें नांव ज्या शाखेस दिलें तो त्या शाखेचा कर्ता असे झाले.

ऋग्वेद पूर्ण ज्याचा झाला षट्शाखि नाम त्या होय
ऐसें नघडे दुर्घट म्हणुनी ऋषिराज ही करी सोय ५

ऋग्वेद ज्याचा पूर्ण झाला त्याला षट् शाखी झाला असें म्हणतात तसे ब्राह्मण होणें कठीण म्हणून ऋषीश्रेष्ठ यानी ही सोय केली आहे ५

वेदोक्त कोणमंत्र कोणाकर्मास वदति ऋषिपुत्र
ज्या ऋषिनें जें कथिलें त्याला तन्नाम तें म्हणा सूत्र ६

वेदानें सांगितलेले मंत्र कोणत्याकर्मास कोणते घ्यावे हें ज्या ज्या ऋषीपुत्राहीं सांगितलें त्यास त्या ऋषीचें नांव देऊन सूत्र ह्मणतात ( आश्वलायन, कात्यायन याची शुक्ल यजुर्वेदावर श्रौत सूत्र यज्ञाकरितां–आणि गृह्यसूत्र संस्काराकरितां एकाचीच आहेत, लाट्यायन, गोभिल, कौशिक, राणक असीं अनेक आहेत.

**कात्यायन ऋषि कथित क्षत्रियकर्म प्रयुक्त जो नियम**
**तो कात्यायन सूत्रीं या ज्ञातींतेंचि होय हा नियम ७**

कात्यायन ऋषीनें जें सूत्र केलें त्यांत क्षत्रिय धर्मास जें उक्त तें कर्म सांगितलें यास्तव क्षत्रिय जातीस तेंच सूत्र असा नेम ( निश्चय ) होता. ७

**बहुछंदीं बहुतमतें बहुतऋषी कथित जीं बहू असती।**
**केवल तत्वार्थाला पाहा तरिं धामिं एकल्या बसती ८**

पुष्कळ छंद [ बृहती, गायत्री, त्रिष्टुप्, अनुष्टुप् आदिकरून छंदांत ] पुष्कळ मतें पुष्कळऋषींनी सांगीतलेली असीं अनेक आहेत. [ एकांत एक प्रकार दुसऱ्यांत दुसरा प्रकार ] परंतु केवळ निश्चयाला पाहूं गेलें असतां एकाच घरांत असतात. ८

**आकाशाहुनि पडतें सर्वत्रार्णविंच पावतें हो तें।**
**जल तैसें कर्म सकल एका ब्रह्मींच पावतें होतें. ९**

जसें आकाशांतून मेघाचें उदक सर्व ठिकाणीं पडतें तें समुद्रांत एके ठिकाणीं पावतें तेंही गंगोदक पाढरें यमुनोदक काळें असीं अनेक वर्णाचीं ( रंगाचीं ) एके समुद्रांत मिळालीं ह्मणजे एकवर्ण होतात. तसीं सर्व ठिकाणचीं अनेक प्रकारचीं कर्में आचार हे एकेच ठिकाणीं ब्रम्हांस मिळतात. ९

**कर्मीतेंच क्रियोदक देतां वदती भले हि तेंऽर्पणहो।**
**सद्ब्रह्मा याकृतें होय सदेकेश्वरासि तर्पण हो. १०**

कर्मकर्ते जे सूज्ञ आहेत ते केलेलें कर्म बाधक नव्हावें ह्मणून त्या कर्माच्या शेवटीं केलेल्या क्रियेचें फल तें उत्तम ब्रह्म जें त्यास अर्पण होवो असें उदक देतानां बोलतात. तें केल्यानें उत्तम जो जगदीश्वर [ जगाचा ईश्वर ] त्यास तर्पण होतें. १०

**तर्पणाचि तृप्तिकारण होतें जगदीश्वरीं जरीं फलद ।**
**हो नम्रणतां करा जें तें परहि असो तरीं हि हो फल द ११**

तर्पणजें तें जगदीश्वराच्या ठाईं तृप्तीस कारण होतें परंतु ह्याचें फल प्राप्त होवो ह्मणून नम्रणतां जर कराल तर [ संकल्पांत ममाभिष्ट सिध्यर्थ असें नम्हणतां परमेश्वर प्रीत्यर्थ म्हणाल तर ] तें कर्म पराचें [ ब्राम्हणानें क्षत्रियाचें आणि क्षत्रियानें ब्राम्हणाचें ] जरीं केलें असलें तरीं फल ( सायुज्य मुक्ति ) देणारें होतें. ११

**कर्म दुजें धर्म-दुजा वर्णहि परमेश्वरीं न भिन्न वसे ।**
**तेथें ब्राम्हण.क्षत्रां कर्म द्विधा म्हणति ते सभिन्नव से १२**

ईश्वराच्या ठायीं कर्मवेगळें धर्म वेगळा वर्ण वेगळा असें वसतच नाहीं ईश्वराविषयीं ब्राम्हण कर्म वेगळें क्षत्रियकर्म वेगळें असें जे म्हणतात ते भेदबुद्धिनें असणारे आणि नवे ( नासमज- ] जसे तसेच. १२श्रीमद्भगवद्गीता अध्याय ९ श्लोक .... .... .... .... ....

**समोहं सर्वभूतेपु न मे द्वेष्योस्ति न प्रियः ।**
**ये भजंति तु मां भक्त्या मयि ते तेपुचाप्यहं.२१**

**अर्थ.** मी सर्वभूतां विषयीं सारखा आहें. मला कोणी द्वेषी आणि कोणी प्रिय नाहीं. जे मला भक्तीनें भजतील ते माझ्या ठायीं आणि मी त्यांच्या ठायीं आहें

**श्रीमद्भगवद्गीता अध्याय ५ श्लोक.**

**नादत्ते कस्यचित्पापं नचैव सुकृतं विभुः ।**
**अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यंति-जंतवः १५**

**अर्थ**—ईश्वर कोणाचें पाप व कोणाचें पुण्य घेत नाहीं. अज्ञानानें ज्यांचें ज्ञान गुंडाळलें त्याणें ते प्राणी मोह पावतात. श्लोक

**विद्या विनय संपन्ने ब्राम्हणे गवि हस्तिनी ।**
**शुनि चैव श्वपाके च पंडिताः सम दर्शिनः १८**

**अर्थ**—ब्राम्हणांत विद्या झाली ह्मणजे तो स्वभावेंच गर्वास चढतो असे फार असतात पुष्कळांत एकादा वेदांती झाला तर तो गबताठा टाकून नम्रवृत्ती धरितो तो विनयसंपन्न

म्हणावा. त्याविषयीं. गायीं हत्ती, कुत्रें, श्वपाक ( महारमांग ) यां विषयीं पंडीत जे आहेत ते सम पाहतात. अध्याय ९ श्लोक.

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येपि स्युः पापयोनयः ।
स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेपि यांति परांगतिम् ३२

अर्थ–स्त्रिया आणि वैश्य आणि शूद्र आणि त्या पलीकडील चांडालादिक पापयोनि जे तेही मला भजुन आश्रय करून असले तर अर्जुना ते परमगतीला पावतात. श्लोक

किं पुनर्ब्राम्हणाः पुण्याः भक्ता राजर्षयस्तथा ।
अनित्यमसुखंलोकमिमं प्राप्य भजस्व मां १२

अर्थ–मग पुण्यवंत ब्राम्हण राजर्षी यांकरितां काय अधिक सांगू अर्जुना हा मृत्युलोक अनित्य [ सतत राहणार नाहीं ] यांत सुख नाहीं अशा लोकांस पावला आहेस तर पाऊन ( हें समजून ) मला भज १२ .... .... .... .... .... .... .... .... ....

स्कंदी सह्यग खंडी जें आदि रहस्य त्यांत एकविशीं ।
अध्यायिं त्रयस्त्रिंशत्श्लोकिं महेशोक्ति पाहा याचविशीं. १३

स्कंद पुराणांत सह्याद्रि खंडांत आदिरहस्यांत एकविसावे अध्यायांत तेहतीसाव्या श्लोकांत या विषईं ईश्वराची अज्ञा पहा. १३

स्कं० पु० स० खं० आ० अ० २१

ब्राम्हणैः क्षत्रियैः वैश्यैः श्रुति मंत्रेण पूजयेत्. ३३

श्लोकार्थ ब्राम्हण क्षत्रिय वैश्य जे त्याहीं वेद मंत्रानें सर्वांही पूजा करावी. वर तें गीतांत आदि करून या वाक्यास अनुकूळ बरेंच सांगितलें असतां ही येथें पुनः कां घेतलें असा संशय येईल तर कारण असें. ब्रह्मदेव, स्कंद, मनु आदिकरून यांचीं मतें तशीं आहेत परंतु सर्वांत श्रेष्ठ महादेव त्यांचें मत कोठें आहें असी कल्पना घेणारांच्या समाधानी करितां घेतलें आहें. आणखी श्री विष्णूची उक्ती पद्मपुराण प्रथमार्ध मलि ( अधिक ) मास माहात्म्य अध्याय. ४

श्री लक्ष्मीनें प्रश्न केल्यावरून श्री विष्णु सांगतात.

श्री लक्ष्मी रुवाच.—कीदृशो ब्राह्मणः प्रोक्तः कथं पूज्यो मलिम्लुचे।

**किंफलं लभते मर्त्यः पूजनाच द्विजन्मनः २**

अर्थ. ब्राह्मग ह्मगतात तो कसा असतो अधिक महिन्यांत कोणास पूजावा. द्विजन्मा ब्राह्मण पूजल्या पासून मनुष्याला फल काय मिळतें.

**श्री विष्णुरुवाच.—देवो मुनि द्विजो राजा वैश्य शूद्रो विडालकः ।**
**पशु म्लेंछोथ चांडालो विप्रा दशविध स्मृतः ३**

अर्थ.—देव मुनि [ ऋषी ] द्विज (ब्राह्मण) राजा (क्षत्रिय) वैश्य, शूद्र, माजर, पशु [ चतुष्पाद ] म्लेंछ आणि चांडाल असे दाहा प्रकारचे विप्र ह्मटले आहेत.

**श्रीरुवाच.—लक्षणं ब्रुहि विप्राणां देवादीनां सुरेश्वर ।**
**कथं संज्ञायते नाथ एतद्देवोच्यतां मम ४**

अर्थ. देव आदिकरून दाहा प्रकारचे विप्र जे ते कसे वोळखावे या करितां मला त्यांची लक्षणें कसीं तीं सांगा.

**श्रीविष्णु रुवाच.—भिक्षाश्यध्यापकश्चैव संतुष्टो विजितेंद्रियः ।**
**वेदशास्त्रार्थ तत्वज्ञ विप्रो देव प्रकीर्तितः ५**

अर्थ. भिक्षान्न खाणारा. अध्यापन [ लोकांत वेदादि हीतकारक विषय शिकविणें ] करणारा सार्वकाल संतोष वृतीने राहणारा. अंतर्बाह्य सर्व इंद्रियें आपल्या वशांत ठेवणारा. वेद आणि शास्त्र हीं अर्थ तत्वासहीत जाणणारा. असीं लक्षणें ज्यांत असतील तो विप्र देव ह्मटला आहे.

**अकृष्ट फल मुलाशी वनवास रतः सदा ।**
**कुरुतेऽहरहरः कर्म सविप्र ऋषि उच्यते ६**

अर्थ. पिकून पूर्ण होऊन गळेलली ज्यांना बोडून घेणें पडत नाहीं असीं फळें, मुळें हीं खाणारा. वनांत राहणें ज्यास सार्वकाल आवडतें असा. प्रतिदिवसीं कर्म कर्तव्य तें करितो तो विप्र ऋषि ह्मणतात.

**तपः सत्यमहिंसांच षट्कर्माणि दिनेदिने ।**
**नभवत्कामलोपश्च सर्वे ब्राम्हण उच्यते. ७**

तपश्चर्या करून खरें ( बोलणें आचरणें ) हें व्रत आहे ज्याचें हिंसा ( जीवहत्या ) करीत नाहीं आणि प्रति दिवसीं सहा कर्मे तीं ज्यावेळेस जें करणें तें त्यावेळेस करीत आहे असा जो त्यास ब्राह्मण ह्मणतात. सहा कर्मे कोणती तीं स्मृतींतून सांगीतली आहेत पहा

पाराशर स्मृती. अध्याय १

संध्यास्नानं जपो होम स्वाध्यायो देवतार्चनं ।
वैश्वदेवातिथेयश्च षट् कर्माणि दिनेदिने.

रात्रिदिवस संधी प्रातः स्नान, दिवसरात्र संधी सायमस्नान करून जप [ गायत्री मंत्राचा १ ] होम [ अग्निहोत्राच्या कुंडांतील अग्नीस आहुती २ ] स्वाध्याय [ वेदादि आध्ययन ३.] देव [ कुल, उपास्य देव ] पूजा. ४ वैश्वदेव [ आपण खाणार त्या अन्नाचा दिवसा सुर्यादि रात्रीं अग्न्यादिकांस आहुती देऊन बलीहरण करणे ५ ] अतिथी घेऊन त्यास भोजन घालणें ६. हीं प्रतिदिवसीं सहा कर्मे. ह्या स्मृतींतीलच. श्लोक १६॥ पासून ३७॥ आणि पुढें ४०॥ पावेतों. आणि अध्याय ८ श्लोक ३१ आणि अध्याय १२ श्लोक २८ सापुढें ३२ पर्यंत पहा. ह्या अतिथी विधी.

अश्व वाहन तत्वज्ञः संग्रामे नच भी कचित ।
आरंभे नीतिमान् शूर क्षत्रियोऽसौ प्रकीर्तितः ८

घोडे आदिकरून वाहनें यांचीं तत्वें जाणता युद्धांत कोठेंही भीत नाहीं कोणत्याहि कामाचा आरंभ नीतीनें करिता शूर असा जो तो. क्षत्रिय ह्मटला आहे.

लोहकर्मणि निष्णातः पशूनां परिपालकः ।
कृषि वाणिज्य कर्ताच स विप्रो वैश्य उच्यते ९

लोहादीक धातू यांचीं साधनें करण्यांत फार कुशल. पशुंचे पालन कर्ता, शेती आदिकरून जमीनी पासून उत्पन्न करिता, आणि व्यापार करिता, तो वैश्य ह्मणतात.

स्नेह लाक्षा तिला नीलि क्षारं क्षीर घृतं मधुः ।
मद्यादि विक्रयी वीप्रः स शूद्रः परिकीर्तितः १०

तेल, लाख, तिल, नीळ, खार, दूध, तूप, मध ( सहद ) मद्य [ दारू आदिक मादक पदार्थ ) यांचा विक्री करणारा जो विप्र तो शूद्र ह्मटला आहे.

स्तेय प्रियोऽदयो लुब्धो दांभिको लोकवंचकः ।
हिंस्रकर्माभिकामश्च विप्रो मार्जार उच्यते ११

चोरी कर्माच्या ठायीं प्रीति, दया नाहीं, कांहींही पाहिलें तें आपणास प्राप्त व्हावें असा, थोडे आचरून लोकानी अधीक चांगलें ह्मणावें या हेतूनें असणारा, लोकांना फसऊन मिळविणारा, हिंसा करावी अशी कामना निरंतर असणारा, विप्र त्यास **माजर** ह्मणतात.

भक्षाभक्ष समो यस्तु समो दारान्ययोरपि ।
कृत्याकृत्यं न जानाति कृतघ्नो ब्राम्हणः पशुः १२

कोणतें खाण्याचें आणि कोणतें न खाण्याचें हा भेद न ठेवितां सर्व सारखें समजणार, आपली स्त्री जसी तसीच पराचीहीं, करणें नकरणें जाणत नाहीं, केलेलें मोडणार. असा ब्राम्हण जो तो पशु.

वापी कूप तडागानां क्षेत्राणां च विनाशकः ।
स्नान संध्या विहीनश्चसविप्रो म्लेंछ उच्यते १३

पायऱ्यांच्या विहिरी, दोरानें पाणी काढण्याच्या विहिरी, तळीं, आणि तीर्थाचीं ठिकाणें, यांचा नाश करणारा, स्नान संध्या या कर्मा विरहीत राहणारा असा जो तो विप्र तो **म्लेंछ** ह्मणतात.

क्रूरो लब्धः प्रमादीच परद्रव्यापहारकः
निर्दयः सर्वभूतेषु विप्रश्चांडाल उच्यते. १४

मन आकृती आणि स्वभाव हे भयदेणारे, विषयमात्राचा लोभ स्वभावतः बीस्मृतीनें कामकर्ता, पराच्याद्रव्याचें हरण कर्ता आणि भूतमात्राच्याठायीं निर्दय असे ज्याचे गुण त्या विप्र **चांडाल** ह्मणतात.

एवं विधं द्विजवरं मलमासेतु योर्चयेत् ।
चंदनाक्षत पुष्पैश्च धूप दीपोपहारकैः १५

या प्रकारचा श्रेष्ट जो द्विज त्यास मलमासांत जो चंदन अक्षता फुलें धूप दीप आणि उपहार याणें पूजील.

**नैवेद्यैर्विविधैर्भक्ष्यैस्तांबूलादि विलेपनैः**
**पूजयेत् प्रत्यहं विप्रं सर्वशास्त्रार्थपारगं १६**

नैवेद्यानीं अनेक प्रकारच्या खाण्याच्या पदार्थांनीं विड्यानीं, सुगंध लेपनानीं सर्वशास्त्रांचाअर्थजाणता प्रतिदिवशीं पूजावा. १६

**इतिहास पुराणज्ञं विशेषेण तमर्चयेत्।**
**मत्परं मत्पराभिज्ञं शांत दांतमलोलुपं १७**

इतिहास [ भूतकाळींच्या घडलेल्या गोष्टि ] पुराणें, यांचा ज्ञाता जो माझ्याठायीं भक्ति ठेवणारा, आणि माझेभक्तांस जाणता शांत [ स्वभावानेंशांत ] दांत [ इंद्रियांचें दमन करून आपल्या वशांत ठेविलीं आहेत ] अलोलुप [ कोणत्याही विषयाच्याठायीं बुद्धि प्रवेश होऊंदेतनाहीं ] अशास विशेषेंकरून पूजावें. १७

**पुराणस्यच वक्तायो हरिरित्यभ्यधीयते।**
**तस्मै दत्तं द्विजाग्ऱ्याय तदानंत्याय कल्पते १८**

पुराणांचा ( आपण वेदशास्त्र समजून तपश्चर्याकरून दुसऱ्यास समजून ) सांगता जो तो हरि असें ह्मटलें आहे तशा द्विजाग्रणीस जें दान दिलें तें अनंतगुण असें समजतात. १८

**यो वेद सततं भक्त्या पुराणानि द्विजोत्तम:**
**आत्मार्थंच परार्थंच स हरिर्नात्रसंशय: १९**

जो वेद शास्त्र यांचा अर्थ पुराणें तीं भक्तीनें आपल्या आणि दुसऱ्यांच्या अर्थांकरितां जाणतो तो हरि: [ नारायण रूप यांत संशय नाहीं.] १९।२० सहीत २५ पर्यंत सोडिलें.

**नविद्यया केवलया तपसा वापि पात्रता।**
**यत्र वृत्ति मिमेचोभे तद्धिपात्रं प्रचक्षते २६**

एका वेदाशास्त्राध्ययनानीच किंवा केवळ तपानीच पात्रता प्राप्तहोत नाहीं जेथें वेद शास्त्र पुराणें, ही विद्या आणि तपश्चर्या ह्या दोनी वृत्ती रूप वसतात तेंच पात्र असें ह्मणतात. २६,२७, २८ सोडलें.

**विद्या तपोभ्यां हीनेने नतु ग्राह्यः प्रतिग्रहः**
**गृह्णन्नप्रदातारमधो नयत्यात्मानमेवच २९**

विद्या (वेद शास्त्र पुराणज्ञाता) आणि तप या दोहीं करून हीन जो असेल. [ ज्याला विद्या आणि तप या दोहींचें बळ नसेल ] त्याणे दान घेऊं नये. जर घेयील तर दानदेणाराला आणि आपल्याला असे दोहोंना ही अधोगतीस नेईल. २९

दान, अध्ययन, याजन, यांस देव; मुनि; ब्राह्मण, सर्वज्ञ, लक्षणें सांगितली त्याणीं युक्त असा असेल तर दानादिकास पात्र आहे. नाहींतर आपण अधोगती [ नरकास ] जाऊन दान देणारास ही नेईल. याकरितां दानकर्त्यानें हा विचार अवश्य पाहिला पाहिजे. अपात्रीं दान झाल्यापेक्षां नझालें तें चांगलें.

हे श्रुति शास्त्र पुराणें प्रपादित प्रकार आहेत. हे ऐकणें नाहींत असें ह्मणणारास काय करावें असा प्रसंग येईल तेव्हां मनु स्मृति अध्याय २. श्लोक.

**श्रुतिस्तु वेदो विज्ञेयो धर्मशास्त्रंतु वै स्मृतिः ।**
**ते सर्वार्थेष्वमीमांस्ये ताभ्यां धर्मो हि निर्बभौ. १०**

**अर्थ.**—श्रुति वेदास ह्मणावें किंवा जाणावें. आणि मनु आदिकरून यांही कथन केलें तें शास्त्र अशा दोहोंस प्रतिकूल अशा तर्कानें विचारांत घेतलेल्या गोष्टी योग्य नाहीत. कारण कीं, त्या दोहोंपासूनच सर्व धर्म प्रकट आणि निश्चित झाला आहे.

**योवमन्येत ते मूले हेतु शास्त्राश्रयाद्द्विजः ।**
**स साधुभिर्बहिष्कार्यो नास्तिको वेद निंदकः ११**

**अर्थ.**—जो कोणी द्विज ( ब्राम्हण क्षत्रिय आणि वैश्य ) धर्माचीं मुख्यमुळें असीं जीं दोन श्रुति [ वेद ] स्मृति ( शास्त्रं ) यांची वेदास विरुद्ध अशा तर्क शास्त्राच्या आश्रयानें अवगणना करील ( तें एकीकडे ठेऊन माझेंच ऐका ह्मणेल ) तो नास्तिक आणि वेद निंदक समजून त्याला शिष्टजनाहीं आपल्या वेदाध्ययनादीक कर्मांपासून बाहेर घालवावा. ११

**प्रभुकुल क्षत्रिय वर्णी त्याचे आचार्य षष्ठविंशति ते ।**
**नामें कथूनि उपनामें कथिलीं गणुनि पाहवे किति ते. १४**

क्षत्रियवर्णांत प्रभुकुलांत सवीस आचार्य [ गोत्रऋषी ] ते नावें सांगून या कुलांत उपनावें जीं आहेत तीं ( या ऋषींत कोणत्यांत किती ) सांगितलीं यावरून ऋषी किती ते मोजून पहा. १४

**श्री पद्मपुराणांत उत्तम माहात्म्य रेणुका नामीं ।**
**कात्यायन सूत्रांत वर्णियलें ऐकिलेंचि कानां मीं. १५**

श्री पद्मपुराणांत रेणुकामाहात्म्यांत आणि कात्यायन सूत्रांत जें सांगीतलें आहे तें मी कानांनी आयिकलें. १५

**कश्यप हि कृपाचार्य देवल वैधृव हि भार्गवाचार्य ।**
**शांडिल्य पैंग्य अत्री विश्वामित्राणि गर्गकृतकार्य. १६**

कश्यपाचार्य १, कृपाचार्य २, देवलाचार्य ३, वैधृवाचार्य ४, भार्गवाचार्य ५, शांडिल्याचार्य ६, पैंग्याचार्य ७, अत्र्याचार्य ८, विश्वामित्राचार्य ९ आणि गर्गाचार्य १०, या क्षत्रिय कुलाचीं कामें केलेले. १६

**भारद्वाज हि गौतम जमदग्नि वसिष्ठ भृगु अगस्ति वर ।**
**रैभाचार्य हि भागुरि सांख्यायन योग्य देति जे सुवर. १७**

भारद्वाजाचार्य ११ गौतमाचार्य १२ जमदग्न्याचार्य १३ वसिष्टाचार्य १४ भृगवाचार्य १५ अगस्त्याचार्य १६ रैभाचार्य १७ भागुराचार्य १८ सांख्यायनाचार्य १९ हे महायोग्य आपल्या कुळांस उत्तम वर देणारे. १७

**मैत्रायणि अणि गंधमादन अणि व्याघ्र कपिल पुलह तसे ।**
**समिर हि वरनाचार्य हि गोत्रींचे मुख्य होति हेचि असे. १८**

मैत्रायनाचार्य २० गंधमादनाचार्य २१ व्याघ्राचार्य २२ कपिलाचार्य २३ पुलहाचार्य २४ समिराचार्य २५ वरनाचार्य २६ हे सव्वीस गोत्रांचे मुख्य होत इतकींच गोत्रें आहेत. १८

**आचार्य नाम संख्या कथिली आतां तयांत उपनामें ।**
**जीं तीं कथितों ऐका संशय राहूं नयेचि या कामें. १९**

आचार्यांच्या नावांची संख्या सांगीतली आतां त्यांत उपनामें जीं आहेत तीं सांगतों. कारण या कामानें यांत संशय राहूं नये. १९

**गरुडे गुप्ते बधिरे काश्यप गोत्रीं असे तिथे जाणा ।**
**दिक्षितांचि कृपाचार्यी क्षिप्र पट हि देवलीं मनीं आणा. २०**

गरुडे १ गुते २ बधिरे ( बहिरे ) असे तीन कश्यप गोत्रीं कृपाचार्य गोत्रांत दिक्षित एकच १ देवलाचार्य गोत्रांत क्षिप्र १ आणि घठ २ असे दोन समजा. ३०

मुक वैधृवाचार्यी करनटि आणि प्रधान भार्गवि घे ।
तिलकार देवयात्रे पैंगाचार्यी खळें असेचि तिथे. २१

वैधृवाचार्य गोत्रांत मुके १ एकच. भार्गवाचार्यांत करनटी १ प्रधान २ असे दोन पैंगाचार्यांत तिलेकर ( टिळेकर ) १ देवपात्रे २ खळे ३ असे तीन. २१

चित्रे शांडिल्यांत मोहियले अणिक ते बखारे हो ।
दोनीहि अत्रिगोत्रीं गर्गी उलकंद एकसारे हो २२

शांडिल्याचार्यांत चित्रे १ एकच. अत्र्याचार्यांत मोहिले १ बखारे २ हे दोन गर्गाचार्यांत उलकंद १ एकटेच झाले. २२

विश्वामित्रीं वैद्य पंगुल अणि कोरडे तिथे जाणा ।
भारद्वाजीं चौवळ गौतामें फणसे असेंचि वाखाणा. २३

विश्वामित्राचार्य गोत्रांत वैद्य १ पंगुल [ पांगळे ] २ कोरडे ३ असे तीन. भारद्वाजाचार्य गोत्रांत चौवळ १ आणि गौतमाचार्यांत फणसे १ असे एकएक. २३.

जमदग्नीचे खाटिक ताह्मणे ते वसिष्ठ गोत्रींगा।
भृगुगोंत्रीं दळवै जे दुसरे ते नाचणे चि सत्रीं गा : २४

जमदग्न्याचार्यांत खाटिक १. वसिष्ठाचार्यांत ताह्मणे १. भृग्वाचार्यगोत्रांत दळवि १ नाचणे २ असे दोनयज्ञांतसांगा वदाहो २४

जयवंत आणि दुसरे भृंगारपुरे हि जावलेकर ते।
आगस्त्याचार्याच्या गोंतीं कर्मास जाहले करिते २५

आगस्त्याचार्यच्यागोत्रांत कर्मकरिते झाले ते जयवंत १ भृंगारपुरे २ जावलेकर ३ असे तीन २५

*रैभाचार्यी राघव गडेकरी दोन असति त्यां ज्ञा त्या ।*
भागुरिगोत्रांत भिपे एकचि जाणा हि विनावितों ज्ञात्या २६

रैभाचार्यगोत्रांत रावत १ गडेकरी २ असे दोन आहेत. त्या सूज्ञांस आणि भागुर्या चार्यात भिषे १ एकच त्यांस जाणा असें ज्ञात्यांस विनवितों २६

**सांख्यायनीं रणदिवे सातपुते आणि सुळे तिघेहि तसे।**
**पाटणकर चवथे हो मैत्रायणि एक बेंद्रवे हितसे २७**

— सांख्यायनाचार्यांत रणदिवे १ सातपुते २ सुळे ३ हे तिघे तसेच पाटणकर ४ चवथे-मैत्रायण्याचार्यांत बेंद्रे १ एकटेच चांगलेसे २७

**लिखिते होती गंधमादन गोत्रीं विवादि व्याघ्रांत।**
**कामठ कपिलाचार्यी दवणे पुलहीं असाचि सिद्धांत २८**

गंधमादनाचार्यांत लिखिते १ एकच. व्याघ्राचार्यगोत्रांत विवादि १ एकच. पुलहाचार्यांत दवणे १ एकच. असाच निश्चय आहे २८

**समिराचार्यी दाभल वरणाचायात सेनवी असती।**
**बेचाळिस उपनामक क्षत्रिय पर्दविंश गोत्रिं हे वसती २९**

समिराचार्यांत दाभल १ एकच. वरणाचार्यांत सेनवी १ एकच आहेत. असे सव्वीस गोत्रांत बेचाळीस उपनामाचे क्षत्रिय वर्तमानीं आहेत २९

**दिक्षित नामांस दिघे राजे क्षत्रीय ह्मणति क्षिप्रांस।**
**कर्नाटकि कर्णिक ते करनटि नामीं प्रतिष्ठ हो प्रास ३०**

—दिक्षित नावाचे आहेत त्यांस दिघे म्हणतात. क्षिप्र नावांच्यांस राजे १ क्षत्रिय २, करनटि नावाच्या विषयीं करनाटकीं १ कर्णीक २ असे दोन नावानें प्रस्थापित आहेत ३०.

**ताम्राण्यांसी तांबे दळवी यांलागि बोलती दोंदे।**
**बेंद्रव नामीं बेंद्रे आणि दुर्वे ह्मणति तें मनिं वसोंदे ३१**

ताम्राण्यांस तांबे ह्मणतात. दळवियांस दोंदे ह्मणतात बेंद्रव नावांत बेंद्रे १ आणि दुर्वे २ असे म्हणतात हें मनांत असूंद्या ३१

**चौवळ जे त्यां चावक पाटनकर तेचि पालवणकार।**
**नाचण नाडकर वदति शृंगारपुरांसि नाम तुंगार ३२**

चौकळांस घ्यावक म्हणतात. पाटणकरांस पाल्वणकर म्हणतात. नाचण्यांस नाडकर आणि शृंगारपुऱ्यांस तुंगारे म्हणतात ३२

दाधल ते जे वावुल चित्रे ते घोलकाख्य झाले गा ।
कामठ काळे बेवादी जे त्यांहेलभाट नामें गा ३३

दाधल यांना वावुल आणि चित्रे यांस घोलके म्हणतात. कामठ जे त्यांस काळे. बिवादी जे त्यांस हेलभाट म्हणतात ३३

शब्दापभ्रंशानें सार्थक परियायजन्य जीं झालीं ।
नामें जीं कांहीं तीं कथिलीं श्रवणांत जेवढीं आलीं ३४

शब्दाचा अपभ्रंश जाहल्यानें, आणि परियायानें अर्थकरून, जीं झालीं तीं जितकीं ऐकण्यांत आलीं तीतकीं सांगितलीं ३४

स्पष्टाणि गर्भितार्थें नामें जीं विद्यमानपभ्रंशें ।
झालीं त्यां गोत्र न ह्या भ्रमणीं नपडोचि चित्त या भ्रंशें ३५

स्पष्ट आणि गर्भित अर्थानें जीं नावें दिसतात त्या अपभ्रंशित नावांस गोत्र नाहीं अशा भ्रमणांत ( आपलें ) चित्त याभ्रांतीनें पडूंनये ३५

उपजीवन उद्योगें त्यापरि जीं जात देश स्थायानें ।
नामें तीं कळवाया क्षत्रिय कुलजांस कळविलें यानें ३६

उपजीविकेच्या उद्योगानें, तशींच देशांत गावांत राहिल्यानीं, जीं नावें झालीं आहेत तीं. आपल्यास कळवावीं म्हणून या ग्रंथकर्त्यानें क्षत्रिय कुळांत उत्पन्न झालेल्या लोकांस कळविलें होते. ३६

विख्यात जो वऱ्हाड सांप्रत तो होय देश विख्यात ।
नाम इलचपुर तेथिल वऱ्हाडमित्र प्रसिद्धआख्यात ३७

( कधीं कशानें म्हणतील तर ) वऱ्हाड नावाच्या देशांत इलचपूर नावाच्या गावांत वऱ्हाडमित्र नावाच्या वर्तमान पत्रांत सर्वदेशांत प्रसिद्ध झालें होतें ३७

त्या पत्रीं निध्यद्री वसु भू मित या समांत इसवींच्या ।
दशमीं मासीं एकविंशति दिवसीं पुढेंहि वर्स्वींच्या ३८

त्या पत्रांत निधि. ९ आद्रि. ७ वसु. ८ भू १ अंक जे आहेत ते वामगती समजून मांडावे असा नियम आहे तसे मांडिले ह्मणजे १८७९ इतकीं समा ( वर्षे ) होतात त्या इसवी [ इंग्लिश ] सनांत दाहावे [ अकटूबर ] महिन्यांत एकविसावे तारखेस आणि पुढें वसु [ दर आठ दिवसांच्या ] पत्रांत जाहिरात आहे ३८

तें पाहवें प्रबुद्धीं परि एकेंही मला न कळवीलें !
लिखिता पत्रा व्यर्थचि सश्रम सौद्योग त्यांस मळवीलें ३९

प्रबुद्धज नाहीं तें पत्र पाहवें. परंतु कोणेकानेंही मला ( ग्रंथकर्त्याला ) कळविलें नाहीं. लिहिलेल्या पत्राला माझ्या उद्योगाला आणि पत्रकर्त्याच्या श्रमाला व्यर्थ मळविलें. ३९

तत्पथ निरीक्षणातें सोडुनि ग्रंथास या करूं पूर्ण ।
आणुनि मनांत केलें काव्यारंभास यापरी तूर्ण ४०

[ तीन महिने पर्यंत वाट पाहून ] त्याची वाटपाहण्यास सोडून या ग्रंथाला पुराकरूं असें मनांत आणून त्वकर या कवितेला आरंभ केला. [ पुराकेला ] ४०

नामप्रसिद्धि कसितरीं हो परि गोत्राविना कुणी न वसे ।
तेंहीं विदित न ज्या त्या काश्यप कथनास मार्ग शुद्ध असे. ४१

नावाचीं प्रसिद्धी कसीही असो परंतु गोत्रावाचून कोणीनाहीं तेंही ( गोत्र ) ज्याला माहीत नाहीं त्यास कश्यप गोत्र सांगण्यास मार्ग शुद्ध [ शास्त्रानें काढून दिलेला ] आहे ४१

प्रवरोच्चरणा करणें लागे हो सन्मखांत कुल गातां ।
विदुषीं कथित दिसे मज जें तें छंदीं ग्रथीं कथीं आतां ४२

उत्तमकर्म [ यज्ञ ] करितां आपल्या कुलांतील तीन पिढयांचा उच्चार [ आपल्या गोत्राचार्याच्या वंशांत श्रेष्ठ ह्मणजे प्रवर त्या ] प्रवरांसह करावा लागतो या करितां विद्वान जनाहीं सांगितलेलें जें मला दिसतें तें छंदांत वोवून [ प्रथून ] आतां सांगतों. ४२

ख्यात श्री कमलाकर भट्ट तनुज रामकृष्ण भट्टाचा ।
यत्कृत निर्णयसिंधू माया तत्कीर्ति ठाव नभ ज्याचा ४३

श्री रामकृष्ण भट्टाचा पुत्र श्री कमलाकरभट्ट ज्याणें निर्णय सिंधू ग्रंथ [ कर्मकर्ते लोकांस अनेक प्रकारचीं ग्रंथवचनें अनेक दिसतात त्यांणीं विवाद पडतो त्यांचा उलगडा केलेला निर्णयरूप जळाचा समुद्र ] केलेला आहे. त्याची किर्ती मावण्यास आकाश

जागा लहान आहे. ४३

**त्या निर्णयसिंधू चा होय परिच्छेद जो अहो तिसरा ।**
**तेथाल्प विस्तर पहा तृषित अनालक्ष्य तेचि वरति सरा ४४**

त्या निर्णयसिंधूंत परिच्छेद ( भाग ) तीन आहेत त्यांत तीसऱ्यांत थोडासा विस्तार आहे तो पहा अहो श्रोतेजनहो तान्हेलेले आणि अलक्षरहीत असेजे असतात ते जलाशयास मिळवितात [ आपण पाण्याजवळ जातात. ] ४४

**त्याच महत्कृतिनें जो केलांसे ग्रंथ प्रवर दर्पण हो ।**
**त्यांत सविस्तर गोत्र प्रवर सुकथितें सदंत तर्पण हो ४५**

त्याच मोठ्याकार्याच्या कर्त्यानें जो " प्रवरदर्पण " नामक ग्रंथ केला आहे त्यांत गोत्रें, प्रवर हे चांगले सविस्तर सांगितले आहेत त्या उत्तम कथनानें बुद्धिमान् लोकांच्या-अंतर्यामास तृप्ती होते. ४५

**तो ग्रंथकार आश्रय जो घे ती प्रवर मंजरी आहे ।**
**श्री बौद्धयन कृत तैं गोत्र प्रवरादि लक्षणा पाहे ४६**

त्या ग्रंथकर्त्यानें ज्या आश्रयानें ग्रंथ केला तो आश्रय ग्रंथ श्री बौद्धायन् [ सूत्रकारांतील हा एक ] कृत " प्रवर मंजरी " नांवाचा आहे त्या ग्रंथांत गोत्र प्रवर आदिकरुन लक्षणें आहेत त्यांस पहा. ४६

**श्री कश्यपात्रि गौतम जमदग्नि वसिष्ठ हो भरद्वाज ।**
**विश्वामित्र अगस्ती हे गोत्रीं अष्ट मुख्य परमाज ४७**

ऋषींत मुख्य कोण ते सांगितले आहेत. कश्यप १ अत्रि २ गौतम ३ जमदग्नि ४ वसिष्ठ ५ भरद्वाज ६ विश्वामित्र ७ अगस्ती ८ गोत्रऋषी हे आठ मुख्य आहेत. ४७

**त्यांचीं आपत्यें ते गोत्रें होती तयासिच प्रवर ।**
**योजित केले मुनिहीं तत्कथित ग्रंथ दर्पण प्रवर ४८**

त्यांचीं आपत्यें ( दैवीकृतीनें प्राप्तझालेलीं ) ते गोत्रें [ गोत्राचार्य ] होत. आणि त्यांलाच प्रवर [ गोत्रवंशांतील श्रेष्ट ] ह्मणतात त्यांची योजना ऋषींहीं केली आहे त्याचा विस्तार ज्यांत सांगितला आहे तो ग्रंथ " प्रवर दर्पण " नावाचा आहे. ४८

गोत्राचार्याचे जे त्रिःपूर्वज आणि पुत्र पौत्र असे ।
प्रवरांत योजिले ते त्यांत चियेणार तो प्रपौत्र असे. ४९

गोत्राचार्यजो आहे तो आणि त्याचे पूर्वज तीन [ बाप आजा आणि पणआजा ] आणि तीन वंशज [ लेक नातु आणि पणतु ] असे मिळून सात पर्यंत प्रवरांत घेतले आहेत. ४९ निर्णयसिंधू पहा शके १८०४ साली बापू सदाशिव शेठ्ये हेगिष्टे याणी छापिलेले प्रतींत परिच्छेद ३ पूर्वार्ध पत्र २७ पृष्ट १

बौद्धायन ऋषि कथितें गोत्रें अतिसंख्य असति परि जाणा ।
तत्प्रवर ऋषी असती त्यांचीं नामें असीं मनीं आणा ५०

बौद्धायन ऋषिनें सांगितलेलीं गोत्रें पुष्कळच आहेत पण त्यांचे प्रवरऋषी जे आहेत त्यांचीं नावें सांगतों तीं असीं आहेत हें लक्षांत ठेवा. ५०

ग्रंथांतरिं भिन्नमतें दिसती प्रवर प्रयोजनीं नैक ।
तत्सार बहुमताचें तें येथें करुन घेतलें एक. ५१

पुष्कळ ग्रंथ पाहण्यांत आल्यानें प्रवरप्रयोजनेचीं वेगळालीं मतें दिसतात [ एका मतांचा मार्ग आपण धरूं गेलें असतां दुसरे मतानें तो अमार्ग दिसतो ] तें पाहण्यांत आलें त्यांत सार काय तें मनांत आणून बहुमता प्रमाणें एथें एक करून घेतलें आहे. ५१

कश्यप गोत्रीं कश्यप आवत्सर रैभ हे तिघे प्रवर ।
तैसेचि कृपाचार्यी आणि वरन मुनि त्रिगोत्रिं हेचि वर. ५२

कश्यपगोत्रीं प्रवर कश्यप, आवत्सर, रैभ. तसेच कृपाचार्य, आणि वरनाचार्य, या दोन्हीगोत्रीं तेच. ५२

देवल गोत्रीं देवल आसीतांगिरस हे तिघे असती ।
वैधृव गोत्रीं भार्गव वितहव्य हि आणि विधृव हे वसती. ५३

देवल गोत्रीं देवल, आसीत, अंगिरस. हे तिघे आहेत वैधृवगोत्रीं भार्गव, वितहव्य, विधृव. हे रहातात. ५३

भार्गव गोत्रीं भार्गव और्व हि जमदग्नि च्यवन हे चार ।
आप्नवान्यंच होती हे पंचप्रवरि वदति साचार. ५४

भार्गवगोत्रीं भार्गव, और्व, जमदग्नि, च्यवन, आप्नवान. हे पंचप्रवरी म्हणतात . खरोखरच ९४

**शांडिल्यातें तीन शांडिल्यासीत देवलासे हो ।**
**पैंगीं पैंग्यांगिरस हरित असे तीन बोलिलेसे हो. ९५**

शांडिल्यास शांडिल्य आसीत, देवल. असे होत पैंग्यगोत्रीं पैंग्य, अंगिरस, हरित. असे सांगितले आहेत. ९५

**अत्री गोत्रीं आर्चनसात्री शावाश्व हे तिघे टिकते ।**
**विश्वामित्रीं विश्वामित्रघमर्षणाणिकौशिक ते. ९६**

अत्रीगोत्रीं अर्चनस, अत्री, शावाश्व, हेतिघे. विश्वामित्रगोत्रीं विश्वामित्र, अघमर्षण, कौशिक. ९६

**गर्गीं गर्गांगिरस सैन्य बृहस्पत्य आणि भरद्वाज ।**
**भारद्वाजीं भारद्वाजांगिरसाणिवार्हस्पत्याज. ९७**

गर्गगोत्रीं गर्ग, अंगिरस, सैन्य, बृहस्पत्य, भरद्वाज. भारद्वाजगोत्रीं भारद्वाज, अंगिरस, बार्हस्पत्य. ९७

**गौतमिं अंगिरसायास्य हि तिसऱ्या जाण गौतमा मुनितें ।**
**ज्ञात्या कविनीं केलें वर्णन सद्भावनीं महा पुनितें ९८**

गौतमगोत्रीं अंगिरस, आयास्य, गौतम. ज्ञाते कवी महापुण्यवान यांही वर्णन केलेले. ९८

**जमदग्नी या गोत्रीं भार्गव च्यवनाप्नवान और्व पहा ।**
**जमदग्नी पांचवा हे पांच प्रवरी म्हणा यशास लहा. ९९**

जमदग्निगोत्रीं भार्गव, च्यवन, आप्नवान, और्व, जमदग्नि. हे पंचप्रवरी म्हणा यशप्या. ९९

**वसिष्ठमुनि गोत्रीं ते वसिष्ठ अपरेंद्र तो तिजा प्रमद ।**
**विग्रह मद प्रकाषित दिसतो पारं निश्चयें नसे श्रमद. ६०**

वसिष्ठगोत्रीं वसिष्ठ, इंद्र, प्रमद. ह्याचे नाव क्रूर पण आचरण श्रम देणारे नाहीं. ६०

**भृगु गोत्रीं शर होती भार्गव च्यवनाप्नवान हे प्रवर ।**
**चवथार्ष्टिषेण आणि निप हे होती अर्पिते सदा प्रवर. ६१**

भृगुगोत्रीं पांच भार्गव, च्यवन, आप्नवान, आर्ष्टिषेण, निप. हे सदा प्रकर्षानेंदर देणारे

आहेत. ६१

गोत्रागस्तिं अगस्ती दार्ढ्यच्युत इध्मावह हे तीन।
रैभाचार्यी कश्यप आवत्सर रैभ होति कमलीन ६२

अगस्तिगोत्रीं अगस्ति, दार्ढ्यच्युत, इध्मावह. असेतीन रैभाचार्यगोत्रीं कश्यप, आवत्सर, रैभ. हे कुलरूप कमलाचे सूर्य होत. ६२

भागुरिं कश्यप आवत्सर भागुर हे तिघे प्रवर होती।
सांख्यायन्यांगिरस सैन्य गार्ग्य हे सदां सु वर देती ६३

भागुरगोत्रीं कश्यप, आवत्सर, भागुर. हेतिघे सांख्यायनगोत्रीं अंगिरस, सैन्य, गार्ग्य. सदां चांगलावर देतात. ६३

मैत्रायाणीं अत्रेय विष्टर हेरब म्हणाचे काले त्रि।
त्या गंधमादनीं तो सुनहोत्र हि गृत्समद असे हे त्रि ६४

मैत्रायाणिगोत्रीं अत्रेय, विष्टर, हेरब. त्रिकालीं म्हणा. गंधमादनगोत्रीं गंधमादन, सुनहोत्र, गृत्समद. असे तीन ६४

व्याघ्रीं व्याघ्रांगिरस सांकृत्य असे तिघे प्रवर होती।
आख्यां व्याघ्र परि नतो उग्र तद्गिराशि नंददा होती ६५

व्याघ्रगोत्रीं व्याघ्र, अंगिरस, सांकृत्य. असेतीन. नांव व्याघ्र परंतु त्याचे आशीर्वाद आनंद दायक आहेत. ६५

कापिलीं कपिलांगिरस बार्हस्पत्या समेत तीन तसे।
भारद्वाज हि वोदन या गोत्रीं पांच वर म्हणाचि असे ६६

कपिलगोत्रीं कपिल, अंगिरस, बार्हस्पत्य, भारद्वाज, वोदन. असे पांच प्रवर. ६६

पुलहीं अगस्ति माहेंद्र मयोभुव हेचि सगुण संख्यात।
समिरीं समिर हि तैतिर कपिभुव हे तीन होति विख्यात ६७

पुलहगोत्रीं अगस्ति, माहेंद्र, मयोभुव. हेंविख्यातगुणी. समिरगोत्रीं समिर, तैतिर, कपिभुव. हे विख्यात. ६७

ह्यांत त्रिप्रवरी पंचप्रवरी ( पंचावत्ती ) कोण कोण या करितां कोष्टक पहा.

| गोत्राचार्य नाम. | प्रवर. | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | एक | दोन | तीन | चार | पांच | अंक |
| कश्यप. | कश्यप | आवत्सर | रैभ | ० | ० | १ |
| कृप. | कश्यप | आवत्सर [ कृप ] | रैभ | ० | ० | २ |
| देवल. | देवल | आसीत | आंगिरस् | ० | ० | ३ |
| वैध्रुव. | भार्गव | वितहव्य | वैध्रुव | ० | ० | ४ |
| भार्गव. | भार्गव | और्व | जमदग्नि | च्यवन | आप्नवान् | ५ |
| शांडिल्य. | शांडिल्य | आसीत | देवल | ० | ० | ६ |
| पैंग्य. | पैंग्य | आंगिरस् | हरित | ० | ० | ७ |
| अत्रि. | अत्रि | आर्चनस् | शावाश्व | ० | ० | ८ |
| विश्वामित्र. | विश्वामित्र | अघमर्षण | कौशिक | ० | ० | ९ |
| गर्ग. | गर्ग | आंगिरस् | सैन्य | बार्हस्पत्य | भरद्वाज | ११ |
| भारद्वाज. | भारद्वाज | आंगिरस् | बार्हस्पत्य | ० | ० | १२ |
| गौतम. | आंगिरस् | आयास्य | गौतम | ० | ० | १३ |
| जमदग्नि. | भार्गव | च्यवन | आप्नवान् | और्व | जमदग्नि | १४ |
| वसिष्ठ. | वसिष्ठ | ऐंद्र | प्रमद | ० | ० | १५ |
| भृगु. | भार्गव | च्यवन | आप्नवान् | आर्ष्टिषेण | निप.( नृप ) | १६ |
| अगस्ति. | अगस्ति | दार्ढ्यच्युत | इध्मावह | ० | निर्णय | १७ |
| रैभ. | कश्यप | आवत्सर | रैभ | ० | सिंधौ. | |
| भागुर. | कश्यप | आवत्सर | भागुर | ० | ० | १८ |
| सांख्यायन. | अंगिरस् | सैन्य | गार्ग्य [ सांख्यायन ] | ० | ० | १९ |
| मैत्रायन. | आत्रेय | विष्टर | हेरब [ मैत्रायन ] | ० | ० | २० |
| गंधमादन. | गंधमादन | सुनहोत्र | गृत्समद | ० | ० | २१ |
| व्याघ्र. | व्याघ्र | अंगिरस् | सांकृत्य | ० | ० | २२ |
| कपिल. | कपिल | अंगिरस् | बार्हस्पत्य | भारद्वाज | ओदन | २३ |
| पुलह. | अगस्ति | महेंद्र | मयोभुव [ पुलह ] | ० | ० | २४ |
| समिर. | समिर | तैतिर | कपिभुव | ० | ० | २५ |
| वरण. | कश्यप | आवत्सर | रैभ [ वरन ] | ० | ० | २६ |

ह्यांत पंच प्रवरी जितके आहेत तितके पंचावत्ती होत. हे यज्ञकर्त्या यजमानांत असतील तेथें यांची एक आहुती अधीकप्या असी अग्नीस प्रार्थना झाल्या वाचून अग्नी त्या होमांत आहुति ग्रहण करीत नाहीं. आणि प्रार्थना झाल्यावर ग्रहण करितो, तर ही अधीक कसी तें उदाहरण. श्रावणींत उपाकर्म ( वेद हृदयस्थ असतात त्यांस श्रावण महिन्याचे पौर्णिमेस श्रवण नक्षत्र असेल तेव्हां पासून सहा महिने जागृत ठेवणें ) आणि उत्सर्जन [ माघ पौर्णिमे पासून उत्तरायनांत देवतावाहनादि कामा करितां मोकळे करणें ] हीं प्रत्येक साहा महिन्यानें करणें होत नाहीं ती एकच दिवसिं करितात ह्मास्तव प्रथम राहिल्या कामाचा ( उत्सर्जन कर्माचा ) चरुहोम देऊन नंतर तत्कालिक कर्माचा ( उपाकर्माचा ) दधि सक्तु होम देतात. हें कर्म वेद ग्रहणाचें होय हें बहुतेक लोकांस ठाऊक आहे. त्या यज्ञांत पंचावत्ती ( कोष्टकांत दाखविलेले पांच गोत्रांतील लोक ) यांतील जो कोणी असेल त्याणी अग्नि प्रतिष्टा झाल्यावर अन्न अभिघारिल्यावर [ चरु ह्मणजे तांदळांचा भात अथवा सक्तु ह्मणजे सातूचें पीठ या प्रत्येक द्रव्यावर तूप घातल्यावर ] आपले आपले आसनावर उभे राहून प्रांजलि करून [हात जोडून] मंत्र ह्मणावा. ऋग्वेदी मंत्र संहिता. अष्टक ८ अध्याय ८

ॐप्रसूंतोभक्षमंकरंचरावपिस्तोमंचेमंप्रथमः सूरिरुन्मृंजे ।
सुतेसातेनयंद्यागंमंवांप्रतिंविश्वामित्रजमदग्नीदमे ॥

आणि पंचावत्तीची एक आहुती अधीक घ्यावी असी प्रार्थना करावी आणि होतां ( आहुती देणारा ) यानें इतर यज्ञांत ( ज्यांत पंचावत्ती यजमान नसेल त्या यज्ञांत ) प्रत्येक आहुतीस दोन पिंड ठेऊन आहुती देणें आहे, त्याणें पंचावत्तीच्या होमांत ( यज्ञांत ) तीन पिंड ठेऊन आहुती दिली पाहिजे. तसी तीन पिंड ठेऊन आहुती देतो कीं विसरतो याकडे लक्ष ठेऊन तीन पिंड युक्त आहुती देववावी. असें न झालें तर यज्ञ सांग न होतां व्यंग होईल; तेणें करून कर्म [ यज्ञ ] व्यर्थ होईल. या करितां पंचावत्ती लोकांनीं असें आचरण अवश्य केलेंच पाहिजे. तसें करीत आणि करवीत असावें. प्राकृत किंवा नर्मवादी [ मस्करीचें भाषण करणारे ] यांचें भाषण ऐकून कर्म अंतरूं देऊं नये.

पंचप्रवरी यांस तीसरी आहुती देणें प्राप्त असें होण्याचें कारण काय असी शंका होईल त्यां समाधानार्थ इतिहास माहाभारत आदि पर्वांत आहे. अध्याय ५ आणि ६ आणि सातवा ७ आणि रेणुका माहात्म्य अध्याय ५ हे पहा.

जे पंच प्रवरी ते सर्व भृगुवंशांतील आणि पूर्णाधिकारी आहेत. भृगूऋषीनें जें मान्य केलें तें या सर्वांस मान्य असलेंच पाहिजे. भृगूऋषी हा ब्रह्मदेवाचा मानसज पुत्र होय. ह्याची तपश्चर्या भारी झाली आहे ह्याचें उदाहरण तीन गुणानें तीन मूर्ति· ब्रम्हा, विष्णु आणि महेश ह्यांतून सत्वगुणी कोण आहे असें बोलून काढण्याचें कारण ऋषि मंडळास पडलें हें काम भृगूनेंच होईल असा निश्चय करून भृगुस सांगीतलें भृगु सत्वगुणी कोण याची परिक्षा करण्यास निघाले त्याणी शिवाची भेट घेतली शिवास विचारिलें तुह्मी कोणता गुण ग्रहण केला आहे. त्याणी उत्तर दिलें तुह्मास या गोष्टीची काय अवश्यकता आहे उगाच बसा, असें ऐकतांच हे तमोगुणी. पुढें ब्रह्मदेवास तसेंच विचारितां त्याणी उत्तर दिलें बरा वाटेल तो घेऊं, असें ऐकतांच हे रजोगुणी. पुढें विष्णूस भेटावयास गेले ते डोळे मिटून बसले होते त्यांस हाक मारिली उत्तर दिलें नाहीं ह्मणून उरावर लात मारिली. विष्णूनें नेत्र उघडून भाषण केलें हेऋषी माझें हृदय कठिण आहे याणें तुमचा पाय दुखला असेल असें ऐकतांच, हे सत्वगुणी असा निश्चय केला. विष्णूनें तो लत्ताप्रहार सोसून तें पदचिन्ह उरावर झालें तें भूषण म्हणून मिरविलें आहे. ह्या भृगु ऋषीनी गृहस्थाश्रम धारण केल्यावर अग्निहोत्र घेऊन नित्य अग्निअर्चन चालविल्यांत गार्हपत्याग्नि सार्वकाल जागृत राहूं लागला भृगूची पत्नी " पुलोमा " ही महा पतिव्रता अज्ञान. असतां बापाच्या घरी रडून रडून बापास कंटाळविलें तेव्हां तिचें रडें राहण्याकरितां भय दाखविण्यास बाप बोलला, ये रे राक्षसा हीला घेऊन जा. हें भाषण झाल्यांवेळीं " पुलोम (दंश) " नावाचा राक्षस त्या ऋषीच्या आश्रमा जवळ होता त्याणें तें ऐकिलें तेव्हां पासून तो तीजवर लक्ष ठेवून मोठी झाल्यावर आपण नेऊं असें संकल्पून होता. पुढें देव अग्नि आणि ब्राह्मण यांच्या साक्षीनें भृगुऋषीस विवाहून दिली. तेव्हां ' पुलोम (दंश) " यत्न करूं लागला पण भृगु तपस्वी त्याच्या तप तेजामुळें राक्षसाचा उपाय चालेना. असें प्रकारें बहुत काळ गेल्यावर एके दिवशीं भृगु होम साहित्य आणि माध्यान्हिक कर्मा करितां बाहेर नदी तिरीं असतां पुलोम राक्षस घरीं येऊन भृगुपत्नी " पुलोमा " हीला नेण्याचा यत्न करूं लागला. तो तेथें रक्षणार्थ गार्हपत्य ( गृहपतीचा ) अग्नि तत्पर होता म्हणून भय पावला आणि अग्निचें कांहीं तरी संमत घ्यावें ह्या करितां अग्नीस विचारिलें तूं जेव्हां पुलोमेच्या बापाच्या घरीं होतास तेव्हां हीच्या बापानें " राक्षसा हीला घेऊन जा " असें स्पष्ट बोलून दाखविलें ते तूं ऐकिलें आहेस. ह्या भाषणावरून ही स्त्री माझी आहे. हीला मी नेणें योग्य आहे-किंवा कसें? अग्नीनें उत्तर दिलें शब्दबोलून तुला दिली खरी परंतु विधीनें ( वेदमंत्र म्हणून ब्राह्म

विवाह तंत्रेंकरून देव, अग्नि, ब्राह्मण यांच्या साक्षीनें ) भृगूस दिली आहे, आग्नीचें हें भाषण ऐकून त्या-राक्षसानें ऋषिपत्नी पुलोमा गरोदर होती तिला उचलून नेली. तिचे उदरांत गर्भ जो होता तो आपल्या सामर्थ्यानें गर्भ स्थान सोडून बाहेर आला तो च्यवन ऋषी [ गर्भ स्थानापासून च्यवला ह्मणून क्रियाविशेष नाम ] झाला. भृगूऋषी घरीं येऊन पाहतात तों ही अवस्था पाहून अग्नीस ह्मणाले तूं जागृत असतां राक्षसानें स्त्री हरिली हें कसें झालें. अग्नीनें उत्तर दिलें तीच्या बापानें वाचेनें राक्षसास दिलीहोती हें खरें असें माझ्यातोंडचें भाषण धरून राक्षसानें हरिली यामुळें मी कांहीं केलें नाहीं. हें ऐकतां ऋषीनें ह्मटलें तुझ्या साक्षीनें मला विधीनें प्राप्त झाली असतां तूं असें बोललास तुझ्या भाषणाचें प्रमाण नाहीं तर असा-तूं जो तो सर्वभक्ष हो ह्मणजे अमेध ( यज्ञाच्या उपयोगी नाहींत अशा मळादिक वस्तु ) भक्षक हो. ह्या शापानें अग्नीस रागयेऊन हुत ( होमद्रव्य ) भक्षण ही सोडिलें तेणें करून सर्व यज्ञ राहिले सूर्य इंद्रादि देवतांचीं तोंडें बंद झाली. तेव्हा सर्वांहीं अग्नीस समजाऊन तुजला ऋषीचा शाप झाला तो त्याच्या तप सामर्थ्यामुळें मिथ्या होणार नाहीं. तथापि तुझ्या स्वाहा स्वधा प्राणसंबंधिनी ज्वाला मुखस्थानीं आहेत त्या हविर्द्रव्य भक्षण करतील, आणि आपान संबंधिनी गुदस्थानीं ज्या ज्वाला मलादि भक्षण करितील. असा तूं सर्वभक्ष असून पवित्र आहेस. असें विष्णू शिवादिकांनीं केल्यावर ही भृगुच्या होत्रांत राहण्यास अग्नि दुश्चित्त झाल्यावरून यज्ञ होईना आणि भृगूऋषी महान् त्यांच्या आहुती वांचून यज्ञदेवतांस तुष्टी होईना म्हणून भृगूस अग्नीचें समाधान करावयास सर्व देवांहीं बळविल्यावरून अग्नीच्या तुष्टयर्थ तीसरी आहुती देऊन तुष्ट केला. हें भृगूनी मान्यकेलेलें भृगुवंशजांस अवश्य कर्तव्य झालें. ह्मणून भृगूवंशज जे भार्गव त्यांचा हा आचार झाला. भृगुवंशांतील ऋषिश्रेष्ट. भार्गव १ और्व २ जमदग्नि ३ च्यवन ४ आप्नवान् ५ गर्ग ६ अंगिरस् ७ सैन्य ८ बार्हस्पत्य ९ भरद्वाज १० आर्ष्टिषेण ११ निप १२ कपिल १३ ओदन १४ चवदा ऋषी मिळून पांच गोत्रींचे लोक पंचप्रवरी होत. ते पंचावत्ती.

**श्री चंद्रसेन कुलजां वेद हिशाखा हि सूत्र गोत्र तसे ।**
**प्रवर हि संस्कृत्यधिकाराणिक उपनाम विषय हे हितसे. ६८**

• श्री चंद्रसेन राजर्षिकुलच्या लोकांस वेद, शाखा, सूत्र, गोत्र, प्रवर, संस्कार आणि कर्मीधर्माचा अधिकार आणि उपनामें हे विषय चांगले खऱ्या रीतीचे. ( यांचा ) ६८

**पुण्याख्य पत्तनाच्या निकट असे नाम मावळा नाणें ।**
**त्या देशाचा लेखक बळवंतानुज ह्मणूनि जन जाणें. ६९**

पुणें शहराच्या जवळ [ दाहा कोशांवर पोळ्याबाच्या वडगावांच्या शिंवेस कान्हें गांव लागलें आहें तेथून ] नाणे मावळ जो देश आहे त्या देशाचा लेखक [ देशपांड्या ] बळवंतरावाचा धाकटा भाऊ असें लोक जाणतात. ६९

**पंचप्रवरी भार्गवगोत्री आवासुतामृतें रचित ।**
**आहे ग्रंथमणी हा क्षत्रिय ज्ञात्युष्णिर्षीच हो खचित. ७०**

पंचप्रवरी भार्गवगोत्री आबाजीचा पुत्र अमृत याणें रचिलेला हा ग्रंथ मणी आहे ( अमोल रत्न आहें ) हा क्षत्रिय जातीच्या पागोट्यां [ मुकुटांत ] खचित ( अंगठीवर हीरा कोंदणानें खचितात तसा खचलेला ) होवो. ७०

**इति चांद्रसेनीय कायस्थ प्रभु धर्माधिकार संग्रहे वेद, शाखा, सूत्र, प्रवर गोत्र, उपनाम, अपभ्रंशोक्त नाम प्रकार. कथनंनाम द्वितीयोध्यायः २**

असा चांद्रसेनी राजाचा वंश कायस्थ प्रभु यांच्या धर्म आणि अधिकारांचा संग्रह नावाच्या ग्रंथांत वेद, शाखा, सूत्र, प्रवर, गोत्र, उपनामें, अपभ्रंशित उपनाम. प्रकार. सांगितला आहे हा दुसरा अध्याय. २

# अध्याय तिसरा प्रारंभ.

**ब्राह्मण षड्विंशति गुणयुक्त असति तेचि दैवि संपत्ती ।**
**नवसे त्यांच्याठायीं पर पैशुन्यादि ते अ संपत्ती. १**

ब्राह्मण सव्वीस गुणानें युक्त जे असतात तेच, आणि त्यानांच दैवी संपत्ती म्हणतात. त्यांच्या ठायीं दुसऱ्याचें पैशुन्य [ उणें दिसेल तें समजून वाढविणें ] आदिकरून जे गुण तें भिकारी लक्षण वसत नाहीं. १

श्री० भ० गी० अ० १६

**अभयं सत्वसंशुद्धि र्ज्ञान योग व्यवस्थितिः ।**
**दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवं १**

अभयं ( निर्भय ) सत्वशुद्धि [ चित्तशुद्धि ] ज्ञानयोगांत चित्त ठेवणें दान [ सत्पात्र पाहून देणें ] दम ( बाह्येंद्रियांस आपल्या आधीन ठेवणें ) यज्ञ [ संध्या होमादि कर्म ] सुआध्याय [ वेदशास्त्राभ्यास करून लोकांस सन्मार्ग दाखविणें ] तप [ व्रत नियम उपोषणादि तापें करून शरीर तापविणें, कृष्य करणें ] आर्जव ( वांकडें न राहतां सर्वांपाशीं सरळ भावानें मिळून वागणें )

**अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शांतिरपैशुनं ।**
**दयाभूतेष्वलोलुत्वमार्दवं न्हीरचापलं २**

अहिंसा [ जीवहत्या न करणें ] सत्य [ खरें बोलणें आणि तसें वागणें ] अक्रोध [ कोणी दुःख दिलें तरीं राग न येणें ] त्याग वाईट ( म्हणजे परधनाभिलाष आणि कृतकर्मफल यांची इछा न ठेवणें ) शांति [ कांहींही अर्थ होण्याकरितां यत्न करून निर्फल झाला असतां संताप येऊं न देणें ] अपैशुनं ( जनाच्या क्षुद्र बुद्धि आचाराकडे लक्ष देऊन तोच विषय अधिक वाढविणें हें "पैशुन्य पिशुनाचें" कर्म सोडून राहणें ) दयाभूतेषु [ सर्वभूतां विषयीं दया ठेविणें ] अलोलुत्व [ निर्लोभत्व, निःस्पृहत्व ] मार्दवं ( मृदुस्वभावानें असणें विद्यागुण गर्वाचा ताठा न ठेवणें ) न्हीः [ निर्लज्जपणानें न राहतां बऱ्यावाईटाचा विचार करून समर्याद राहणें ] अ चापलं [ आचार विचार हे स्थिर ठेवणें ] २

**तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानता ।**
**भवंति संपदं दैवीमभिजातस्य भारत ३**

तेजः ( विद्या, तप, आचारादि करून कर्मास मलिनता न येऊंदेतां असणें ) क्षमा [ जनांच्या हातून अपराध झाले तरी ते अपराध न केल्याप्रमाणें जनांस वर्तविणें ] धृतिः [ धैर्य धारणा ] शौचं [ आचार मन आणि शरीर शुद्ध ठेवणें ] अद्रोहो ( कोणाचाही द्वेष न करणें ) नातिमानता ( मानापमान सम मोजून राहणें ] हीं दैवीसंपत्तींत झालेल्या पुरुषाचीं लक्षणें होतात. ३

श्री० भ० गी० अ० १८ तोच महाभारत भीष्मपर्व अध्याय ४२ श्लोक

**ब्राम्हण क्षत्रिय विशां शूद्राणांच परंतप ।**
**कर्माणि प्र विभक्तानि स्वभाव प्रभवैर्गुणैः ४०**

**अर्थ** हे शत्रूंस ताप देत्या ( अर्जुना ) ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांचीं स्वभावा पासून झालेल्या गुणांनीं कर्मे वेगळालीं ( आहेत ) यावर

चतुर्धर गोविंद सूरि सूनु नीलकंठ कृत महा भारतोपरि टीका **" भारत भावदीपिका "** नाम्नि तस्यां **"स्वभाव प्रभवैर्गुणैः** स्वभाव ईश्वरस्य प्रकृति स्त्रिगुणात्मिका सैव प्रभावोहेतुर्येषां गुणानां ते स्वभाव प्रभवास्तैः यद्वा ब्राह्मण स्वभावस्य सत्वगुणएव प्रभवः शांतत्वात् । क्षत्रिय स्वभावस्य सत्वोपसर्जनं रजः ईश्वर स्वभावत्वात् । वैश्य स्वभावस्य तम उपसर्जनं रजः कृष्यादि स्वभावत्वात् । शूद्र स्वभावस्य रज उपसर्जनं तमः शुश्रूषा स्वभावत्वात् अथवा स्वभावः प्राग्भवीयः संस्कारस्तत्प्रभवै र्नतुजातिमात्रप्रभवैः पक्षिणामाकाश गमनवत् । अतएव जात्यंतरं व्यावृत्तानां धर्माणां शमादिषु पाठो न दृश्यते । नहि शुद्राद्व्यावृत्तं त्रैवर्णिकानामध्ययनादिकं वा इतर द्वयाद्व्यावृत्तं ब्राम्हणानामध्यापनादिकं वेह पठ्यते किंतु सर्वे सर्वजातीयानां साधारणा धर्माः शमादयो दृश्यंते । यथा हि द्रोणादिषु ब्राम्हणेष्वपि शौर्यादिकं. भरतादिषु क्षत्रियेष्वपि शमादिकं दृष्टं. एवमितरत्र तस्माद्यस्मिन्कस्मिश्चिद्वर्णे शमादयो दृश्यंते स शूद्रोऽप्येतैर्लक्षणैर्ब्राम्हणएव ज्ञातव्यः । यत्रच ब्राम्हणेऽपि शूद्रधर्मा दृश्यंते स शूद्रएव । तथाचारण्यके सर्पभूतं नहुषं प्रति युधिष्ठिर वाक्यं

**सत्य दान क्षमा शीलमानृशंस्यं तपो घृणा ।**
**दृश्यंते यत्र नागेंद्र स ब्राम्हण इतिस्मृतः ।**
**तथा. यत्रैतल्लक्ष्यते सर्प वृत्तं स ब्राम्हण स्मृतः**
**यत्रैतन्न भवेत्सर्प तं शूद्रमिति निर्दिशेत् ।**

जातिधर्मास्तु मनुनादर्शिताः
अध्यापनंचाध्ययनं यजनं याजनं तथा ।
दानं प्रतिग्रहं चैव ब्राम्हणानामकल्पयत्
प्रजानां रक्षणं दानमिज्याध्यनमेवच ।
विषयेष्वप्रसक्तच क्षत्रियस्य समादिशत्
पशूनां रक्षणं दानमिज्याध्ययनमेवच ।
वणिक्पथं कुशीदंच वैश्यस्य कृषिमेवच
एकमेवतु शूद्रस्य प्रभुःकर्म समादिशत्
एतेषामेववर्णानां शुश्रूषामनुसूयया ।

तस्मात् शमादयो यत्राब्राम्हणे ब्राम्हणे वा दृश्यंते सएव ब्राम्हणः ”

अर्थ चौधरी गोविंद देवाचा पुत्र नीलकंठ याणीं महाभारतावर केलेली टीका भारत-भाव दीपीका नावाची तींत “स्वभावापासून उत्पन्न झालेल्या गुणांनीं स्वभाव म्हणजे ईश्वराची प्रकृति त्रिगुणा (सत्व १ रज २ तम ३) त्मक तोच प्रभाव तो त्या गुणांचा उत्पन्न कर्ता, गुण जे उत्पन्न होतात त्याणीच स्वभाव वोळख होते, जसा ब्राम्हणस्वभावाचा सत्वगुणच शांतत्वापासून दिसतो. क्षत्रियस्वभावाचा सत्वगुणमिश्ररजोगुण ईश्वरस्वभावानिमित्त ईश्वरस्वभावाचें लक्षण “उन्मार्गवर्तिनां नियमनशक्तिः ” [ वाईटमार्गानें चालणाऱ्यांचे मार्गबंद करण्याची शक्ती ]

वैश्यस्वभावाचा तममिश्ररजोगुण कृषि आदिकरून व्यापारनिमित्त वृत्ती.

शूद्रस्वभावाचा रजमिश्रतम सेवा (साह्य) करण्यानिमित्त. अथवा पूर्वी झालेले संस्कार जे त्यांपासून उत्पन्न झालेल्यांनी, जन्मजाला येणेकरूनच प्रभव, जाती (वर्ण) नव्हे पक्षी आकाशांत उडतात तसे (एकपखानें आकाशांत जाणार नाहीं दोनपखें असलीं पाहिजेत. तीं जन्मतः स्वभाव १ आणी संस्कार कर्माचा अभ्यास २ असे दोन पक्ष होतील तेव्हां संचार करील)

यावरूनच जातीभेद (ब्राम्हण -क्षत्रिय वैश्य.) यांचा विचार करून पाहतां धर्माचा शमादि• गुण वर्णनाच्या ठायीं पाठ दिसत नाहीं. तसाच शूद्रादिक जातीचा अमुकच गुण असेंहि विचारांत घेतां येत नाहीं. तीन वर्णाचीं अध्ययनादिक, अथवा क्षत्रिय वैश्य यांन

वेगळून ब्राम्हणांचीं अध्यपनादिक, असें येथें म्हणतां येतनाहीं कां कीं सर्वजातीयांचे साधारण सर्व-धर्म शमादिकरून स्पष्ट दिसतात. जसे द्रोणादिक ब्राम्हणांच्याठाई शूरत्वादिकरून, आणि भरत आदिकरून क्षत्रियांच्याठायीं शमादिक, असेच इतर वर्णांत. यामुळें ज्या कोणत्या वर्णांत (वर्गांत) शमादिकरून गुणकर्मे दिसतात तो शूद्रजरीं आहे तरीही या लक्षणांनीं युक्त आहे. तर तो ब्राम्हणच समजावा. जरीं ब्राम्हणआहे तरीही त्यांत शूद्राचे धर्म (काम क्रोधादि-करून) दिसतात तर तो शूद्रच समजावा. जसा वनपर्वांत नहुषराजा सर्प झालेला त्यास धर्मराजानीं उत्तरें दिलीं त्यांतील श्लोक **सत्य दान** आदिकरून दोन श्लोक अर्थासहीत पुढें दुसरे आर्येवरील उपपत्तींत पहा.

जातीधर्म मनूनें दाखविले. आध्यापन, आध्यायन, यजन, याजन, दान, प्रतिग्रह, [ यांचा विस्तार या ग्रंथांत ६४ पेज पहा ] ब्राम्हण वर्णाचे असी कल्पना करावी.

प्रजांचे रक्षण, दान, यजन, आध्ययन, विषयानुरक्ती. [विस्तार या ग्रंथात पेज ८९ पहा] हे क्षात्रियाचे. पशूचें रक्षण, दान, यजन आणि आध्ययन, तसेंच व्यापार आणि सेतीकरणें. वैश्यास. शूद्रास एकच कर्म मुख्य इश्वरानें लाविलेलें तें तीनही वर्णास त्यांचें व्यंग न पाहतां साह्य करावें.

यावरून शम आदिकरून जेथें अब्राम्हण म्हणजे इतर सर्ववर्णांत किंवा ब्राम्हणांत दिसतील तोच ब्राम्हण. ”

क्षत्रियांत ब्रम्हण्यता ह्मणजे ( ब्राह्मणत्व ) शम, दान, तप, असें सर्वत्र आढळतच आहे. उदाहरणार्थ महाभारत भीष्मपर्व अध्याय ११२ श्लोक २० पहा.

शूद्रधर्मा सूत आधिरथ याच्याघरीं कर्ण वाढला तो संस्कार रहीत राहिला ह्मणून त्यास सूत म्हणूलागले तो शूद्रसम होता तथापि त्याच्याठायीं ब्रम्हण्यता असून क्षात्रधर्म चालवीत होता. हा गुण आणि कर्मे यांहीं युक्त असल्यामुळें क्षात्रधर्मानेच सायुज्य मुक्तीस पावला. पहा महाभारत भीष्मपर्व अध्याय १२२ श्लोक १३ १४ १९ ३४ ३६ ३७

**नव कर्मेंचि स्वभावज शम दम तप आदिकरुनि जीं होती ।**
**तीं वसति ब्राह्मणाच्या ठायीं न मृषा प्रभूक्ति जी होती २**

शम दमादि नवकर्मे जीं आहेत तीं ब्राह्मणाच्याठायीं स्वभावेंकरून राहतात असें ईश्वराचें सांगणें जें आहे तें खोटें नव्हे हो २

श्री० भ० गी० अ० १८

**शमो दमस्तपः शौचं क्षांतिरार्जव मेवच**
**ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजं ४२**

शमः ( अंतरींद्रियें मन बुद्धि आदिकरून हीं आपले आधीन ठेवणें ) १ दमः ( बाह्येंद्रियें श्रोत्रादिकरून हीं आपलें वशांत ठेवणें ) २ तपः ( वरते अर्थ लिहिला आहे तो पहा ) ३ शौचं [ वरतें पहा ] ४ क्षांतिः [ वरतें शांति आणि क्षमा यांचे अर्थ पहा ] ५ आर्जवं ( वरतें पहा ) ६ ज्ञानं ( व्यवहार आचारादिक विषय मनु याज्ञवल्क्य पाराश स्मृतींत सांगितलेले जाणण्या करितां बुद्धि समर्थ ) ७ विज्ञानं ( पृथ्वी आप तेज वायु राकाश मन बुद्धि अहंकारादि स्वात्मा परात्मा सर्वात्मा अभेद रूपें जाणण्यास बुद्धि समर्थ ) ८ आस्तिक्यं ( अरूप अनाम अलक्ष्य तेंच ब्रह्म मनांत पाहून व्यक्ति मात्रांत तेंच आहें असें जाणून स्वस्तिवाचक तुझें कल्याण असो आदिकरून भाषण कर्ण्यास जाणून तसें वर्तणें ) ९ हें ब्राह्मणांचें कर्म स्वभावा पासुन झालेलें आहें. ४२

श्रीमहाभारत वनपर्व अध्याय १८० सोमवंशी राजा नहुष सर्पझालेला धर्मराज्यास प्रश्नकरून धर्म उत्तरें देतो. ह्यावर **चतुर्धरगोविंदसूरिसुनूनीलकंठ** ( चौधरी विद्वानांत देव मानण्या जोगा गोविंद याचा पुत्र नीलकंठ ) पंडीत याणे केलेली टीका " भारतभाव दीपिका " म्हणजे सायंत भारतावर सुबोधिनी केलेली पहा. ती संस्कृत आहे. मी प्राकृत लिहितों.

सर्पउवाच. **ब्राह्मणः को भवेद्राजन्वेद्यं किं च युधिष्ठिर ।**
**ब्रवी ह्यतिमतिं त्वांहि वाक्यैरनुमिमीमहे २०**

अर्थ हे राजा तुझ्या बोलण्यावरून तुला बुद्धिवान असें मानुन मी प्रश्न करितों ह्याचीं उत्तरें दे. ब्राह्मण कोणहोईल. आणि समजलें पाहिजे तें काय. २०

युधिष्ठिर उवाच. **सत्य दान क्षमा शीलमानृशंस्यं तपो घृणा ।**
**दृश्यंते यत्र नागेंद्र स ब्राह्मण इतिस्मृतः २१**

अर्थ हे नागराज्या सत्य, दान, क्षमा, अनिंद्यआचरण, तप आणि दया. हीं जेथें दिसतात त्याला ब्राह्मण म्हटलें आहे. २

**वेद्यं सर्प परंब्रम्ह निर्दुःखमसुखंच यत् ।**
**तत्र गत्वा नशोचंति भवतः किं विवक्षितं २२**

अर्थ हे सर्पा समजलें पाहिजे तें परंब्रह्म [ ईश्वर आणी जगत् यांचीं रुपें ] जेथें गेल्यानें शोक करीत नाहींत असुख ह्मणजे दुःख तें निर्दुःख ह्मणजे सुख मानितात तें म्हणजे सुखदुःख सम होतें तें २२

सर्प उवाच. **चातुर्वर्ण्यं प्रमाणचं सत्यंच ब्रम्ह चैव हि ।**
**शूद्रेष्वपि च सत्यंच दानमक्रोध एवच ॥**
**अनृशंस्यमहिंसाच घृणा चैव युधिष्ठिर २३**

अर्थ हे धर्मा चारही वर्णास प्रमाण सत्य आणि ब्रह्म हेंच तें सत्य, ज्ञान, अक्रोध, अनिंद्याचरण, अहिंसा, दया. २३

**वेद्यं यचात्र निर्दुःखमसुखं च नराधिपं ।**
**ताभ्यां हीन पदंचान्यन्नतदस्तीति लक्ष्यये २४**

आणि जें जाणवयाचें तें [ ब्रह्म ] दुःख जें तें सुखा समान हीं लक्षणें शूद्रांत वसतात आणि त्याहून वेगळे ह्मणजे ब्राह्मणादिकांत तीं लक्षणें वसत नाहींत तर ते कसे २४

युधिष्ठिर उवाच. **शूद्रेतु यद्भवेल्लक्ष्म द्विजे तच न विद्यते ।**
**नवै शूद्रोभवेच्छूद्रो ब्राह्मणो नच ब्राह्मणः २५**

अर्थ शूद्रांत लक्षणे असतील आणि ब्राम्हणांत नसतील असा शूद्र तो शूद्र आणि ब्राम्हण तो ब्राम्हण नव्हे म्हणजे तो शूद्र ब्राम्हण आणि तो ब्राम्हण शूद्र असे समजावे २५

ह्या श्लोकावर नीलकंठ पंडीत कृत अर्थ

**" शूद्रोऽपि दशामाद्युपेतो ब्राम्हणएव. ब्राह्मणोपि कामाद्युपेतो शूद्रएव इत्यर्थः "** ह्याचें प्राकृत शूद्र आहे त्यांत शम, दम, तप शौचादिक गुण वसतात तर तो ब्राम्हणच. ब्राम्हणांत काम, क्रोध, लोभ मोहादिक गुण वसतात तर तो शूद्रच. २५

**यत्रैतल्लक्ष्यते सर्प वृत्तं स ब्राह्मणः स्मृत ।**
**यत्रैतन्नभवेत्सर्प तं शूद्रमिति निर्दिशेत् २६**

अर्थ वरती स्पष्ट झाला आहे. २७ २८ २९ ३० सोडिलें. युधिष्ठिर उवाच

**जातिरत्र महासर्प मनुष्यत्वे महामते ।**
**संकरात्सर्व वर्णानां दुष्परीक्ष्येति मे मतिः ३१**

हे सर्पा जाती हें म्हणणें मनुष्यमात्रा सर्वांस एक आहे ह्यासंकरांत [ **सर्व एक पाती** ] वर्णाचा परीक्षा कठीण आहे असी माझी बुद्धि आहे ३१ ३२ ३३ ३४

**तावच्छूद्र समोह्येष यावद्वेदे न जायते । ३४॥**

अर्थ. जो पर्यंत संस्कार होऊन वेदाधिकारी झाले नाहींत तों पावेतो सर्व शूद्र आहेत.

श्रीमहाभारत वनपर्व अध्याय २१२ **कौशिक ब्राह्मणास व्याध** मोक्षधर्म सांगत असतां व्याध उवाच. ३ पासुन १० पावेतों सोडिले.

**शूद्र योनौहि जातस्य सद्गुणानुपतिष्ठतः ।**
**वैश्यत्वं लभते ब्रम्हन्क्षत्रियत्वं तथैव च ११**

टीकाकार नीलकंठ कृत अर्थ जातस्य कर्मणि पष्ठि वैश्यत्वं कर्तृ सद्गुणवंत वैश्यत्वादयः स्वयमायातीति गुणकृत एव कर्म विभागो न जातिकृत इतिभावः

प्राकृतार्थ. शूद्र योनीच्या ठाई उत्पन्न झालेल्यास सद्गुण असेल तर वैश्यत्व क्षत्रियत्व ब्राम्हणत्व पावेल. कर्म अमुक असा विभाग गुणाने पडतो. जाती म्हणजे उत्पन्न झालेल्यानें पडत नाहीं. ११

**आर्जवे वर्तमानस्य ब्राह्मण्य मभिजायते ।**
**गुणास्तेकीर्तिताः सर्वे किं भूयः श्रोतु मिच्छसि १२**

अर्थ. सरल स्वभावानें वर्तणारास ब्राम्हण पणाही प्राप्त होईल. सर्व गुण तुला सांगितले आणखी काय विष्याचें इच्छितोस. १२

वनपर्व अध्याय २१६ व्याधानें धर्म सांगून समजल्यावर कौशिक ब्राह्मण बोलतो.

**सांप्रतं च मतो मेऽसि ब्राह्मणो नात्र संशयः ।**
**ब्राह्मणः पतनीयेषु वर्तमानो विकर्मसु १३**

अर्थ. सांप्रत तूं मला मान्य ब्राम्हिण आहेस यांत संशय नाहीं. ब्राम्हण विकर्मी वर्तत आहे तर पतना विषयींच (असें समजलें पाहिजे.)

**दाभिको दुष्कृतः प्राज्ञः शूद्रेण सदृशो भवेत् ।**
**यस्तु शूद्रो दमे सत्ये धर्मेच सततोत्थितः १४**

दांभिक [ हा सत्कर्मी आहे असें लोकांनी म्हणावें असी इच्छा धरून ] कर्म करिता, शाहाणा असून ही दुष्कृती जो तो शूद्रा सारखाच. आणि जो शूद्र दम सत्य धर्म याठाई सतत हव्यास ठेवितो. १४

**तं ब्राह्मणमहंमन्ये वृत्तेन हि भवे द्विजः**
त्याला मी ब्राम्हण मानितो वर्तन ( वृत्त ) याणेंच द्विज होईल.

असे गुण कर्म विभागानें वर्ण जे निश्चित होतील त्यांणी कर्मे कसीं आचरलीं पाहिजेत या निदर्शनार्थ

उद्योग पर्व. अध्याय ४० धृतराष्ट्रास विदुरानें नीति सांगितली तींत.

**नित्योदकी नित्य यज्ञोपवीती नित्य स्वाध्यायी पतितान्न वर्जी ।**
**सत्यं ब्रुवन् गुरवे कर्मकुर्वन्नब्राम्हणश्च्यवते ब्रम्ह लोकात् २९**

अर्थ. यथा कालीं ( स्नान संधेचे काल जे सांगितले आहेत ते काल न चुकूंदेतां तेंतें त्याला वेळेस ) कर्म करणारा तो नित्योदकी. सूत्र, वस्त्र, अजिन, कमंडलु आसनादि धारणकर्ता यज्ञोपवीती. यथाकालीं वेदादिकांचे अध्ययन कर्ता स्वाध्यायी. पातकी [ वर्णाश्रम धर्म न करून रसादि विक्रय कर्ते ] जनांचें अन्न वर्ज केलेला. खरें बोलणारा. गुरुकरितां कर्म ( भिक्षादिक ) करिता. तो ब्राम्हण ब्रम्हलोकास जाऊन सतत राहील पतन पावणार नाहीं. २९

**आधीत्य वेदान्परिसंस्तीर्यचाग्नीनिष्ट्वा यज्ञैः पालयित्वा प्रजा श्च ।**
**गो ब्राम्हणार्थे शस्त्रपूतांतरात्मा हतः संग्रामे क्षत्रियः स्वर्गमेति २६**

वेदाचें आध्यन करून, अग्नी कमें होम, याग, हेंज्या कर्माचा जो अग्नी त्या कर्मास त्याचें आवाहन परिस्तरणादिक आर्चन हवन हीं कर्मे करून सोमयाग, अश्वमेध, आदिक यज्ञ यांच्या इष्टी करून, प्रजाजनांचें पालन करून, गाई ब्राम्हण यांच्या अर्थी करितां शस्त्रांनी शूद्ध झालेला असा, आणि रणांत मारला गेला. असा क्षत्रिय स्वर्गाला सतत राहतो, २६

वैश्योऽधीत्य ब्राह्मणान्क्षत्रियांश्च धनैः काले सं विभज्याश्रितांश्च
त्रेता पूतं धूममाघ्राय पुण्यं प्रेत्य स्वर्गे दिव्य सुखानि भुंक्ते २७

वेदाचें आध्ययन करून ब्राम्हणांस ( त्यांच्या योग क्षेमार्थ ) क्षत्रियांस ( यज्ञ याग प्रजांचें रक्षण करण्यास सैन्य ठेवणे या करितां ) जेव्हां जसें लागेल तसें धन देऊन आणि आश्रित लोकांस धने वाटून त्रेताग्निचा शुद्धधूर याचें चांगलें आघ्रपण [ यज्ञ करून त्याचे धूर नाकांत गेलेले सोसून ] करून नंतर मेरल तो वैश्य देव लोकींचीं सुखें भोगितो. २७

ब्रम्ह क्षत्रं वैश्य वर्णं च शूद्रः क्रमेणैताञ्चयायतः पूजयानः ।
तुष्टेष्वेतेष्वव्यथो दग्धपापस्त्यक्ता देहं स्वर्गं सुखानि भुंक्ते २८

ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य या वर्णांस अनुक्रमानें [ एका नंतर एकास ] यथान्याय [ प्रत्येक वर्णाचा मनुष्य आपला वर्ण धर्म चालवीत असेल अशाची ( पूजा ) शेवा करून त्यास वर्ण धर्माला साह्य ] करून ते तुष्ट केले असतील [ सति सप्तमि ] तो शूद्र पातकें जाळून शुद्ध झालेला अरोगी राहून मरून स्वर्गाचीं सुखें भोगील. २८

असे गुण आणि कर्में यांनी जो ज्याचा वर्ण ठरला त्याणी त्या वर्णाचे धर्म. [ एकावर्णांत उत्पन्न झाला तो गुण कर्मांनी दुसरे वर्णांत गेला तर ज्या वर्णांत गेला त्या वर्णाचा ] चालऊन राहिला तर त्यास मुक्ती [ स्वर्गवासादिक भोग ] होईल. आणि दुसरे वर्णाचा धर्म चालवील तर पतन पावेलच. प्रमाण महाभारत भीष्मपर्वं भगवद्गीता अध्याय १८ श्लोक .

सहजं कर्म कौंतेय सदोषमपि न त्यजेत् ।
सर्वारंभाहि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः ४८

अर्थ आपल्या देहा बरोबर [ कर्मरेषेंत ] जें कर्म उत्पन्न झालें तें जरीं दोषयुक्त असलें तरीही टाकूं नये. कारण कर्मांचे आरंभ असा धूरानें अग्नी वेष्टित केला आहे तसे दोषानें वेष्टित केलेले आहेत ४८ गीता अ० ३ श्लोक ३५

स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः अर्थ पहिले अध्यायांत पृष्ट ७२ याजवर पहा.

परधर्म भयाव हें वाक्य दिसे परशुराम कृतिस मृषा ।
परि नच तें सार्थक हो दुष्ट विनाशीं प्रभू धरीत रुषा. ३

पराचा धर्म भयावह आहे हें भगवद्वाक्य [ श्रीमद्भगवद्गीता अध्याय. ३ श्लोक १५.

**श्रेयान्स्व धर्मो विगुणः पर धर्मात्स्वनुष्ठितात् ।**
**स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः**

अर्थ. दुसऱ्याच्या चांगल्या धर्माहून आपला धर्म [ वेद शास्त्रोक्त ] जो आहे तो वाईट जरीं आहे तरी तो चांगला कारण तो पुण्य देतो. आपल्या धर्मांत मरण होईल तरीं तें सुखावह होते. पराच्या धर्मानें सुख झालें तरीं तो भय देणारा आहे. ] आहे तें परशुरामाच्या कृतीला ह्मणजे धनुर्धारणकरून क्षत्रियांचा नाश केल्या कर्माला. खोटें आहें असें वाटतें. परंतु तें खोटें नव्हे [ भगवद्वाक्य आणि भार्गव कृती ] सार्थक होय कारण दुष्टांचा नाश करण्या करितां ईश्वर राग धारण करीत असतो. परशुराम विष्णु अवतार आहे. ३ वरतें पहिले अध्यायांत एकोन पंनासावे आर्येच्या खाली दोन श्लोकांचा अर्थ पहा.

**प्राचीन जात ब्राम्हण द्रोहाला न करितीच धर्माच्या ।**
**अर्वाचिन चित्पावन मार्गा अनुसरति ते अधर्माच्या. ४**

प्राचीनजात ह्मणजे कश्यपादि ऋषीं पासून झालेले ब्राम्हण धर्माचा द्वेष करीत नाहींत. कारण त्यांस वेद शास्त्रांस मिथ्या म्हणवत नाहीं मनुस्मृती अध्याय २ श्लोक.

**स्मृतिस्तुवेदो विज्ञेयो धर्मशास्त्रंतु वै स्मृतिः ।**
**ते सर्वार्थेष्वमीमांस्ये ताभ्यां धर्मो हि निर्बभौ. १०**

अर्थ. श्रुतिः ह्मणजे वेद समजावा आणि मन्वादिकांचें जें शास्त्र त्याला स्मृतिः असें समजावें तीं दोन्ही त्यां विरुद्ध तर्कांनी विचार करण्यास योग्य नाहींत. त्यांचा विचारकर्ते यांनीं त्याविरुद्ध जाऊंनये कारण त्यादोहों पासूनच सर्व धर्म प्रकट झाला आहे. श्लोक.

**योवमन्येत ते मूले हेतुशास्त्राश्रयाद्विजः ।**
**स साधुभिर्बहिष्कार्यो नास्तिको वेद निंदकः ११**

अर्थ. जोद्विज [ ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य ] तीं दोनी [ वेद आणि शास्त्र ] धर्मांची मुख्यमूळें त्यांस मनाच्या तर्कानें विपरीत गतीनें मानणार नाहीं, तो नास्तिक वेद निंदक होय. त्याला साधुजनांनीं आपल्या वेदाध्यनादिक कर्मापासून बाहेर घालवावा. त्यास भिऊन चालतात. अर्वाचीन ह्मणजे परशुरामकृत ( परशरामावतारांत समुद्रतीरास स्मशान भूमींत परशुरामानें कैवर्तकांचे ब्राह्मण केलें ) ते ' चितपावन " हे मात्र अधर्माच्या मार्गास धरून चालतात. ४

तो त्यांचा दोष नव्हे धिवरकुला परशुराम शुद्ध करी ।
उपदेश सुकृतिचा जरिं तरिं त्या कुलजात धर्म रुद्ध करी ५

तो त्यांचा दोष नव्हे कारण धिवर कुलाला परशुरामानें शुद्धकेलें आणि उपदेश केला तो सुकृति परशुरामाचा उपदेश जरि आहे तरीं त्या जिप्शवनांत सुबुद्धि होत नाहीं त्याचें कारण त्यांच्या कुलाचा (कैवर्तकांचा) धर्म वनजंतु, जलजंतु पाशांत व्यसनांत गुंतवून मारावें हा असलेला तो त्यांचा गुरु परशुराम यांच्या मंत्रास किंवा त्याणी सदाचरण धरिलें तर त्या मार्गास आडवा येतो. ५

गुह कथिता इतिहासा पाहा स्कंदी च सह्यनग नामीं ।
खंडात उत्तरार्धी प्रथमाध्यायीं करीं न आगा मीं ६

याविषयीं कार्तीक स्वामीनी सांगितलेला इतिहास स्कंद पुराणांत सह्यादि खंडांत उत्तरार्धांत प्रथम अध्यायांत आहे तो पहा. मी ग्रंथकर्ता अपराध (मनाच्या अपकारानें कोणावर खोटा आरोप) करीत नाहीं. ६

*स्कंदपु० सह्या० उत्त० प्रथमोध्यायः

महादेव उवाच. पुरुरवादिविस्तरतो सोमवंशे महाभ्दुतः ।
धर्मस्य रक्षणार्थाय क्षेत्र कर्मण्यते मही २१

महादेव ह्मणतात. पुरुरव्या पासून सोम वंशाचा विस्तार धर्माचें संरक्षण करण्याकरितां क्षेत्र कर्मांत महाभ्दुत (पूर्वीकोणी झाला नाहीं असा क्षत्रियांचा समुह मोटा) झाला. २१

एवं क्षेत्रं महाराज शताधिकावशेषतः ।
रामेण निहतान्क्षेत्रानेकविंशति वारतः २२

असे महान राजांचे समुह शंभराहून अधिक शेषरहीत रामानें एकवीस वेळ करून मारिले. २२

ब्राह्मणानां ततो पृथ्वी दानंदत्वा यथा विधिः ।
नवीनं निर्मितं क्षेत्रं शूर्पाकारमनुत्तमम् २३

नंतर पृथ्वी ब्राह्मणांस यथाविधि (विधि करणें तो करून) दान देऊन नवें क्षेत्र [पृथ्वीचा भाग] सुपाच्या आकृतीचें अतिउत्तम उत्पन्न केलें. २३

वैतरिण्यां दक्षिणे तु सुब्रह्मण्यांस्तथोत्तरे ।
सह्यात्सागर पर्यंतं शूर्पाकारं व्यवस्थितम् २४

वैतरणी नदीच्या दक्षिणेस तसेंच, सुब्रह्मण्याचे [ द्रविड देशाची पश्चिमेची सीमा मंगलोर नावाचें गांव ] उत्तरेस सह्याद्रि पासून समुद्रा पावेतों सूपाच्या आकृतीचें झालें आहे. २४

शत योजन दीर्घंच विस्तारंत्रीणि योजनं ।
भार्गवी मीलिता पृथ्वी समुद्रात्सुख हेतुना २५

शंभर योजनें [ ४०० कोश ] लांब तीन योजनें [ १२ कोश ] रुंद सुखाच्याहेतूनें समुद्रापासून भार्गवानें मिळविलेली पृथ्वी.

क्षेत्रं जवाधिकं काशी तस्मात्तीर्थान्वितं सदा ।
विमलं निर्मलं चैव खादिरं तीर्थमुत्तमं २६

हें क्षेत्र तीर्थासहीत असल्यामुळें त्याहून जव ( कांहीं प्रमाण) भर काशी अधीक आहे असें विमल, निर्मल, खादिर उत्तम तीर्थ. २६

हरिहरेश्वरं तीर्थं मुक्तेश्वर तथैवच ।
बालुकेशो महाश्रेष्ठो बाणगंगा सरस्वती २७

हरिहरेश्वर तसेंच मुक्तेश्वर तीर्थ बालुकेश ( वाळकेश्वर ) बाणगंगा सरस्वती. २७

तस्यास्तु दक्षिणे भागे कुशस्थलिरुदाहृता ।
मठग्राम तथाचान्ये गोमांचल तथैवच २८

तीच्या दक्षिण भागीं कुशस्थली ह्मणतात तसेंच दुसरे ठिकाणीं मठग्राम तसाच गोमाचल ( गोमांतक देशाजवळ डोंगर. ) २८

तत्रैव स्थापितं तीर्थं गोरक्षं च कुमारिजं ।
रामकुंडं कुद्मलंच प्राचीसिद्धं गुणोपमं २९

तेथेंच स्थापिलेलें तीर्थ गोरक्ष आणि कुमारिज रामकुंड कुद्मल प्राचीसिद्ध गुणोपम [ ज्यास उपमा चांगली आहे. ] २९

एवं क्षेत्रं महादेवी भार्गवेण विनिर्मितं ।
तन्मध्ये तु कृतो वासः पर्वते चातुरंगके ३०

हे महादेवी ( गौरी ) भार्गवानें निर्माण केलेलें असें क्षेत्र चार पर्वतांत भार्गवानें वास केला. [ राहिलेला ] त्याणे ३०

श्राद्धार्थे चैव यज्ञार्थे मंत्रिताः सर्व ब्राह्मणाः ।
नागता ऋषयः सर्वे क्रुद्धोऽभार्गवो मुनिः ३१

श्राद्ध करितां यज्ञ करितां सर्व ब्राह्मण बोलाविले ते सर्व ऋषी आले नाहीत म्हणून परशुराम रागावला. ३१

मया नूतन कर्त्रा वै क्षेत्रं नूतन निर्मितं ।
नागता ब्राम्हणाः सर्वे कारणं किं प्रयोजनं ३२

मी नवें करणारा क्षेत्र नवें निर्माण केलें. सारेच ब्राह्मण आले नाहीत ह्या प्रयोजनाचें कारण काय. ३२

हे न येणारे ब्राम्हण कोणते असा संशय उत्पन्न झाला त्याच्या स्पष्टीकरणार्थ हेमाद्रिप्रबंध ( हेमाद्रि पंडिताने प्रश्न केले असून श्री द्रविडाचार्य आणि गौडाचार्य या उभयतां योग्यांहीं उत्तरें दिलीं आहेत तो ग्रंथ ) यांतील अध्याय १८ वां महा ".चित्त पावन प्रसंग "

विस्तार न घेतां थोडक्यांत दाखवितों. क्षत्रिय मारल्यावर परशुरामास अनुताप झाला हेमाद्रि प्रबंध-अध्याय १७ श्लोक

जमदग्न्युवाच. दुःखं महत्समुत्पन्नं पुरा न ब्राह्मणैः कृतं ।
यत्कर्म तत्कृतं राम प्रायश्चितं समाचार २७

अर्थ. हे रामा मोठें दुःख उत्पन्नझालें पूर्वी ब्राह्मणाहीं जें कर्म न केलें तें तूं केलेंस. प्रायश्चित चांगलें घे [ आचर. ] श्लोक

कनीयासौ बांधवास्ते निहताः क्षत्रियास्तुये ।
यावन्नशुध्यते चित्तं तावन्मुक्ति कथं भवेत् २८

अर्थ. कनीय ( ल्हान बांधव म्हणजे तुजहून कमी अधिकाराचे जे क्षत्रिय ते कश्य-

पवंशी आणि तूं भृगुवंशी असे ) बांधव जे ते क्षत्रिय तुं मारिलेस जों पर्यंत चित्त शुद्ध झालें नाहीं तों मुक्ती कशी होईल. [ अधः पातास जासील ] असें जमदग्नि ऋषींचें भाषण ऐकून परशुरामाचें चित्त मलिन झालें कीं आपण वाईट काम करून ( गर्भादि महा हत्या करून ) पातकीं झालों मनास प्रशस्त वाटेना. तेव्हां शोध करितां करितां गर्गऋषीचें दर्शन झालें. त्यास केलेंल कर्म आणि मनाची मलीनता सांगितली. त्यानी आपल्या आश्रमास नेऊन इतर ऋषी तेथें होते. अध्याय १८. हेमाद्रि प्रबंध यांतील. श्लोक

कपिं तथा कौशिकमत्रि कश्यपौ कौंडिन्य नैतुंदन जामदग्नीन् ।
शांडिल्य वासिष्ठक विष्णुवर्धनान् वत्सं भरद्वाजमुवाच गर्गः १२

अर्थ. कपिः १ कौशिक, २ अत्रिः ३ कश्यप, ४ कौंडिन्य, ५ नैतुंदन, ६ जामदग्नी, ७ शांडिल्य, ८ वासिष्ठ, ९ विष्णुवर्धन, १० वत्स, ११ भरद्वाज, १२ ह्या बारा ऋषिकुलांस गर्ग बोलता झाला. १२ परशुराम तुमच्या दर्शनास माझ्या घरीं आला आहे. हें ऐकून ते सर्व गर्गाच्या आश्रमास आले. परशुरामानें त्यांस नमन करून आपला वृत्तांत सांगितला. त्याहीं अभय देऊन परशुरामास शुद्धमना होण्या करितां विधि केला [ प्रायश्चित्त दिलें तो विधि या अठराव्या अध्यायांत लिहिला आहे ] त्याणें परशुरामाचें मन शुद्ध झालें. त्याकरितां परशुरामानें त्या ऋषिकुलांस आपलें चित्त पावन केल्यामुळें " चित्तपावन " असें नांव दिलें. त्याच १८ राव्या अध्यायाचा श्लोक.

नामतोहि भुवि चित्त पावना स्युर्भवंत इति सत्य वाङ्मम ।
अस्तु यावदिह भास्करोदयो गौतमी वसति यावदत्रवै. २३

अर्थ. माझें बोलणें खरें होवो आणि इहलोकीं ( मृत्यु लोकीं ) जों पर्यंत गौतमी गंगा वसत आहे आणि सूर्योदय होत राहील तों पर्यंत तुमचें नाव " चित्तपावन " [ चित्तास शुद्ध करणारे ] असें होवो. श्लोक.

अतःपरं गर्ग मुनीश्वरोयं भट्टाभिधेयोस्तु पुरोहितो मे ।
आचार्यतां कर्तुमयो हि योग्यः सहाय्य एवं कृतवान्मदीयं. २४

अर्थ. येथून पुढें हा गर्ग मुनी श्रेष्ठ भट्ट नाम घेऊन माझें असें साह्य करणारा माझा पुरोहित होऊन आचार्यत्व करण्यास योग्य आहे. ह्या श्लोकांतिल " ही " अक्षर पादपूर्णार्थ आहे. असें न मानिलें तर इतर ऋषींसह असें कदाचित् कोणि समजतील.

ह्या ब्राह्मणांस बोलाविलें होतें. कारण पृथ्वी ही यांसहीत ब्राम्हणांस देऊन. ब्राह्मणांस दान दिलेल्या पृथ्वीवर राहूं नये हें एक. आणि दान दिल्यावर त्या वस्तूचें स्वामित्व दान घेणाराकडे जातें यामुळें तो त्या वस्तूचा स्वामी होतो. ब्राम्हण पृथ्वीचे स्वामी झाले त्या पृथ्वीवर आपण राहून जें कर्म ( सुकृत दुष्कृत ) केलें त्याचा विभाग पृथ्वीपतीस मिळतो हें दुसरें. या करितां नवीन भूमी उत्पन्न करून तेथें ( कोंकणांत ) राहिला होता.

ब्राम्हणा नूतना कार्या एवंचित्तानुग्रहन् ।
सूर्योदये तु स्नानार्थं गतः सागर दर्शने. ३३.

आतां ब्राम्हण नेव करावेच असें चित्तास निश्चयास पोचऊन सूर्योदयीं समुद्र स्नाना करितां गेला तों सागर दिसतो इतक्यांत. ३३

चितास्थाने तु सहसा आगतांश्च ददर्श सः ।
का जातिः कश्च धर्मश्च कस्थाने चैव वासनं. ३४

हिकडे तिकडे पाहण्याचा यत्नांत आहे तों श्मशान भूमींत येणारांस पाहून तो राम [ त्यांस पुसता झाला· ] कोणती जाति, कोणता धर्म, कोठें राहणें. ३४

कथयध्वं च संस्थाप्य कारणं तस्य विद्यते । कैवर्तका ऊचुः ।
ज्ञातिं पृच्छसि हे राम ज्ञाती कैवर्तकी तिच. ३६

हें स्थापून [ स्थिर होऊन ] सांगा त्याचें कारण दिसत आहें. कैवर्तक म्हणतात. हे राम जात पुसतोस ( आमची) जात कैवर्तकी [ कैवर्तकाची ] ३५

मनुस्मृती. रजकश्चर्मकश्चैव नटो बुरुड एवच कैवर्त भेद भिल्लाश्च सप्तैते अंत्यजाः स्मृताः अर्थ परीट १ चांभार २ सोंगाडे ३ बुरुड ४ कैवर्त ५ [ पारधी अनेक प्रकारचीं साधनें करून वनपशु, पक्षी, जलतंतु, मासे, आदिकरून हे मारून उपजीविका करणारे ] मेद ६ भिल्ल ७ हेसात अंत्यज म्हटले आहेत तसेंच अत्रिस्मृति अध्याय १ श्लोक १९६ यमस्मृति अध्याय १ श्लोक ३३

सिंधु तीरे कृताहारो व्याध धर्म विशारदाः ।
तेषां षष्टि कुलानश्रुत्वा पवित्रमकरोत्तदा ३६

समुद्र तीराला आहार केलेले ( पोट भरून राहिलेले ) व्याधधर्म [ फासे, जाळीं,

कांटे, गळ आदिकरून इतर साधनांनीं जीवहिंसा करण्याचा ] यांत मोटे कुशल त्यांची साठ कुळें आहेत हें ऐकून तेव्हां पवित्र ( शुद्ध ) केले. ३६

ब्राह्मण्यंच ततो दत्वा सर्वविद्या सुलक्षणं ।
चितास्थाने पवित्रत्वाच्चित्पावन उदाहृताः ३७

मग ब्राह्मणपण देऊन सर्वविद्येंत गती लक्षणानें चांगलेपण आणि चिता [ स्मशान ] स्थानांत शुद्ध केले ह्मणून " चित्पावन " असें म्हणतात. ३७

सार्वकाल स्मरन्नेवं कार्यार्थेंचागतोस्म्यहं ।
एवं हिचाशिषस्तेषां दत्वा तु भार्गवो मुनिः ३८

सर्वकाल माझें स्मरण ठेऊन राहा कार्याकरितां मी ( तुमच्या स्मरणा बरोबर ) आलोंच ( आलोंच आहें ) या प्रमाणें त्यांस वर देऊन भार्गव राम. ३८

आनीता आलये श्रेष्ठस्त्रैलोक्याधिपतिः प्रभुः ।
एवंच नूतनान्विप्रान्दत्वाद्गोत्राणि नामतः ३९

श्रेष्ठ त्रैलोक्याचा पती राम ईश्वरावतार याप्रमाणें नव्या ब्राह्मणांना गोत्रें नावें देऊन आपल्या घरीं आणिता झाला. ३९

चतुर्दश गोत्रकुला स्थापिताश्चातुरंगके ।
सर्वेच गौर वर्णाश्च सुनेत्राश्च सु दर्शनाः ४०

चौदा गोत्रें [ वरतें चित्त पावनांचे बारा १२ ऋषी सांगीतले ते कपि १ कौशीक २ आत्रि ३ कश्यप ४ कौंडिन्य ५ नैतुंदन ६ जामदग्निः ७ शांडिल्य ८ वासिष्ठ ९ विष्णुवर्धन १० वत्स ११ भरद्वाज हीं बारा आणि गर्ग १३ आणि भार्गव १४ ] आणि नावें चित्तपावनांत बहूत आहेत. ( ह्याच अध्यायांत नूतन कवितेच्या छंदांत ३५ व्या आर्येच्या अर्थांत पहा ) त्यांतून साठ असीं ते ब्राह्मण बोलाविलेले न आले यामुळें त्यांचीच गोत्रें, नावें, आणि धर्म त्या चित्पावनांस देऊन. च्यारअंगाच्या भागांत ठेविता झाला. सारेच रंगानें गौर चांगल्याडोळ्यांचे दिसण्यास चांगले. ४०

सर्व विद्यानुकुलास्ते भार्गवस्य प्रसादतः ।
गता बहुदिना देवी स्वकार्ये कृतवांस्थिताः ४१

सर्वविद्या अनुकूल असे ते भार्गवाच्या प्रसादानें झाले. फार दिवस आपलीं कार्यें करीते झाले असतां ४१

**कुचोद्ये चैवमादाय स्वामि बुद्धि परीक्षणात् ।**
**अकार्यं कुरुते कार्यं स्मरते भार्गवं मुनिं ४२**

वाईट उद्योग आरंभ करणें घेऊन आपला स्वामी परशुराम याच्या बुद्धीची परीक्षा करण्या निमित्त कार्य नसतां कार्य आहे असें करिते भार्गवऋषीला स्मरते झाले ४२

**आगतस्तत्क्षणादेव पूर्वोक्तस्य च कारणात् ।**
**तं नैव दृश्यते कार्यं क्रोधितः स जगद्गुरुः ४३**

पूर्वी आपण बोलले आहों म्हणून त्याच वेळेस येऊन पाहतो तों कांहीं काम दिसेना यामुळें तो जगताचा श्रेष्ट [ परशुराम ] रागावला. ४३

**शापितास्तेन ये विप्रा निंद्याश्चैव कु चित्सकाः ।**
**शापंच प्राप्य ते तस्य कुश्चिताश्च दरिद्रिणः ४४**

त्याणें जे विप्र तेथें होते त्यांस शाप दिला कीं तुम्ही निंद्य वाईटस्वभावाचे होतां तसेच व्हाल असें म्हणतांच कुश्चित आणि दरिद्री झाले. ४४

**सेवा सर्वत्र कर्तार इदं निश्चय भाषणं ।**
**इतिहास कथा देवि तवाग्रे कथितं मया ४५**

सर्वठिकाणीं ( सर्वांची ) सेवा करिते झाले, हे देवी हें इतिहासकथायुक्त भाषण तुजपुढें मी निश्चयरूप सांगितलें. ४५

**चित्पावनस्यचोत्पत्तिरिदं चैवतु कारणं ।**
**सह्याद्रेश्च तले ग्रामश्चित्तपोलन नामतः ४६**

चित्पावनांच्या उत्पत्तीचें हें कारण आहे. सह्यपर्वताखालीं चित्तपोलन [ चिपळोण ] नावाचें गांव आहे. ४६

**तत्रैव स्थापिता विप्रा यावचंद्र दिवाकरौ ४६॥**

त्या गांवीं ते विप्र सूर्य आणि चंद्र आहेत तों पावेतों स्थापिले. ४६॥

ह्या चिपळोणा जवळ उत्तर दिशेस परशराम नावाचें गांव डोंगराच्या वर वसलेलें असून तेथें आराध्य दैवत श्री परशुरामच मुख्य आहे.

**तैसेंच सातव्याऽध्यायांत पहा वृत्त जें असेकाय ।**
**श्री परशुराम त्यांतें शापूनि तपास आचरूं जाय ७**

तसेंच सातव्या अध्यायांत ( स्कंदपुराण सह्याद्रिखंड उत्तररहस्य ) आहे तें वृत्त परशुराम यां [ चित्पावनांस ] शाप देऊन तपास गेला तें पहा.

**स्कंदपु० स० उत्तरर० अध्याय ७ सात**

**स्कंद उवाच. स्थित्वा सह्य गिरेःश्रृंगे चिक्षेप परशुंलघु ।**
**कुठार पतनात्स्थानं कृत्वा सीमां सरित्पतिः २६**

स्कंद ह्मणतात. सह्याद्रीच्या शिखरावर उभा राहून परशु फेकला तो पडल्या ठिकाणा पासून समुद्रानी सीमा करून जागा दिली. २६

**अपसर्पत्प्रवृद्धांबु नदीव शरदागमे ।**
**ततोवतीर्य सैलेंद्र श्रृंगाद्भृगुकुलोद्भवः २७**

शरदृतु ( अश्विन कार्तिक ) यांत नद्या जशा कमी होतात [ आपलीं तटाकें सोडून मागें सरतात ] तसें समुद्राचें वाढलेलें पाणी मागें सरतें झालें मग भृगुकुलांत उत्पन्न झालेला राम पर्वत शिखराहून उतरून. २७

**देशमालोकयामास त्यक्तं वारिधिना तदा ।**
**सह्यपर्वतमारभ्य योजनात्त्रितयावधि २८**

तेव्हां समुद्रानें टाकिलेला देश सह्याद्रि पासून आरंभून तीन योजनें पावेतों पाहतां झाला आणि. २८

**कन्याकुमारी चैकत्र नाशिकात्र्यंबकोऽः परः ।**
**सीमा रूपेण विद्येत दक्षिणोत्तरतः शुभौ २९**

एके कडेस कन्याकुमारी [ सेतुबंधा आलीकडे ] दुसरे कडेस त्र्यंबकेश्वर नाशीक पासून हीं चांगलीं दक्षिणे आणि उत्तेरकडे सीमारूपानें आहेंत अशीं दिसतात. २९

**शतयोज नमायं च विभेदे सप्तधा तलं ।**
**आ ब्रम्हये तदा देशे कैवर्तान्प्रेष्य भार्गवः ३०**

शंभर योजनें लांब ह्या तलाचे सात भाग केले आब्राम्हण्ये ( ब्राम्हणत्व फार आहे तेथें ) तदा देश ( तेव्हां देशांत ) कैवर्तान् [ कैवर्तलोकांस ] प्रेष्य [ पाठऊन ] भार्गवः [ परशुराम ] ग्रंथांतील वाक्यांचा अर्थ लिहिला आहे. परंतु मला वाटतें ज्या प्रतिवरुन हा ग्रंथ छापला त्या प्रतींत लेखक दोष राहिला असावा. पुढील संबंध पाहतां **अ ब्रम्हण्ये तदा देशें कैवर्ता न्मेक्ष्य भार्गवः** असें वाक्य असतें तर याचा अर्थ तेव्हां ब्राम्हणत्व नाहीं अशा देशांत परशुराम कैवर्तकांस पाहून. असा निघता आणि हा मागील पुढील संबंधासह अनुसंधानास मिळता. असें श्लोकार्ध व त्याचा अर्थ तदा ( तेव्हां ) अ ब्रम्हण्ये देशे [ ब्राह्मणत्व नाहीं अशा देशांत ] भार्गवः (परशुराम) कैवर्तान् प्रेक्ष्य ( कैवर्तांस पाहून ) असा वाचावा ह्मणजे पुढें काय करिता झाला तें सम्यग् अर्थानें निघतें. ३०

**छित्वा स बडिशः कंठे यज्ञसूत्र मकल्पयत् ।**
**दाशानेव तदा विप्रांश्चकार भृगु नंदनः ३१**

तो परशुराम त्या कैवर्तकां जवळचीं बडिशें (मासे व पशु पक्षी धरण्याचीं साधनें ) मोडून फाडून टाकून यज्ञसूत्र [ जानवें ] गळ्यांत घालून कैवर्तकांनां ब्राह्मणकरिता झाला. ३१

**क्षोणी तले यद्यदस्ति पुनस्तत्र ससर्जतत् ।**
**वरं ददौ स्व देशेभ्यो दुर्भिक्ष्यं मा भवत्विति ३२**

पृथ्वी तळावर जें जें होतें तें तें पुन्हा तेथें उत्पन्न केलें आणि या माझ्या देशांकारणे दुर्भिक्ष्य होऊनये-असा वर त्या आपल्या देशांस दिला. ३२

**स्थापयित्वा स्वकीये स क्षेत्रे विप्रान्प्रकल्पयेत् ।**
**जामदग्न्यस्तदोवाच सुप्रीतेनांतरात्मना ३३**

आपल्या ब्राह्मणास आपल्या त्या देशांत ( क्षेत्रांत ) स्थापून तो राम उत्तमप्रीतीनें युक्त अशा अंतरानें ( अंतर्यामानें )-कल्पना करून बोलता झाला. ३३

**बहु धान्यवती भूयान्भूरियं सस्य शालिनी ।**
**धन धान्य समृद्धाश्च यूयं भवत सर्वदा ३४**

ही भूमी बहुत धान्य पिकणारी आणि धान्यानें भरलेली असी व्हावी [ होईल ] आणि तुम्ही धन धान्यानें सार्वकाळ परिपूर्ण व्हाल. ३४

यदा कदावा युष्माकं विपत्तिर्जायते भुवि ।
तदाव्हयतु मां सर्वे समवेता सुखाप्तये ३५

जेव्हां केव्हां तुह्माला भूतलाच्या ठायीं दुःख दरिद्र होईल तेव्हां सर्वांहीं मिळून सुख प्राप्तीकरितां मला बोलावावें. ३५

आगत्याहं तदा विप्राः वः कार्यं साधये क्षणात् ।.
इति दत्त्वा वरं तेभ्यो जामदग्न्यः कृपानिधिः ३६

हे विप्रहो मी तेव्हां येऊन क्षणामध्यें तुमचें कार्य साधीन या प्रकारें त्यांस वर देऊन कृपेचा समुद्र किंवा ठेवा राम. ३६

गोकर्णं प्रययौ रामो महाबल दिदृक्षया ।
महाबलेशं संपूज्य विधिवद्भृगुनंदनः ३७

गोकर्णास महाबलेश्वर पाहण्यास जाता झाला. तो परशुराम विधानपूर्वक महाबलेश्वराला पुजून- ३७

किंचित्कालं सचोवास गोकर्णेश्वर संनिधौ ।
गतेतु भार्गवे रामे तत्क्षेत्रस्था द्विजातयः ३८

बहुकाल पर्यंत गोकर्णेश्वरा जवळ राहिला तो भार्गव राम गेल्यामागें त्या क्षेत्रांत राहणारे द्विज सर्व ( परशुराम कृत ब्राम्हण. ३८

धन धान्य समृद्धार्था समवेता कदाचन ।
रामवाक्य परीक्षार्थं मंत्रयामासुरंजसा. ३९

धन, धान्य, अर्थ मनानें इच्छावा तीतका पावत असतां कोणे एके वेळेस परशुरामाच्या भाषणाची परीक्षा करण्या करितां अंजसा [ लवकर सत्वर ] मंत्र यामासु [ बोलाऊं ] लागले, किंवा मंत्रयामासुरंजसा ( बोलावण्यास तयार झाले. ) ३९

मीलितांनाच युष्माकमाहूतिर्मेयदा भवेत् ।
तदागच्छामीति पुरा भार्गवोप्युक्तवान्किल! ४०

तुह्मी मिळून मत्स्य जेव्हां बोलावाल तेव्हां मी येईन असें परशुराम पूर्वी बोलला आहे हा निश्चय आहे. ४०

तत्सत्यमनृतंवेति परीक्षा कुर्महे वयं ।
इति सर्वैः समालोच्य रामेत्यूचैः प्रचुकुशुः ४१

तें बोलणें सत्य किंवा असत्य यांची परीक्षा तुह्मी आह्मी करूं असा सर्वांहीं विचार करून राम अशा उच्च शद्बानें आक्रोश केला. ४१

आक्रंदितं तदा तेषां श्रुत्वा रामः कृपानिधिः ।
प्रादुरासीत्पुरो भागे देवर्षिर्भार्गवः स्वयं. ४२

कृपेचा समुद्र राम त्यांचें आक्रंदन [ रडणें, ओरडणें ] ऐकून भार्गव देवर्षि स्वतः त्यांच्या पुढें येऊन उभा राहिला. ४२

भार्गव उवाच, किमर्थं क्रंदितं विप्राः भवद्भिर्मीलितैरिह ।
किंदुःखं भवतामद्य नाशयाम्यचिरादहं ४३

.भार्गव म्हणतो. हे ब्राह्मणहो तुह्मी येथें मिळून कशा करितां ओरडतां रडतां. आज तुह्माला काय दुःख आहे [ तें सांगा ] मी त्याला सत्वर नाहींसें करितों. ४३

स्कंद उवाच. इति तस्य वचः श्रुत्वा प्रत्यूचुस्ते भयान्विताः ।
न किंचिदपि संप्राप्तं दुःखं त्वत्कृपया विभो. ४४

स्कंद ह्मणतात. असें त्या भार्गवाचें भाषण ऐकून ते ब्राह्मण सभय प्रतिवचनें बोलते झाले. हे प्रभो तुझ्या कृपेनें थोडें बहूत कसेंही दुःख आम्हास प्राप्त झालें नाहीं. ४४

जल्पितं भवता सत्यमनृतंवेतिशंकितैः ।
कैवल्यंतु परीक्षार्थं क्रंदितं मीलितैः प्रभो. ४५

तुम्ही बोललेलें खरें किंवा खोटें ही शंका झाली त्या शंकेनें शंकित जे आह्मी त्यांनी केवळ परीक्षे करितां मिळून ओरडा केला. ४५

इति तेषां वचः श्रुत्वा क्रोध संरक्त लोचनः ।
निर्दहन्निव नेत्राभ्यामालोकयत भूसुरान् ४६

असें त्या ब्राह्मणांचें भाषण ऐकून रागानें डोळे लाल झाले त्यांनी जाळील असा त्या ब्राह्मणांस पाहता झाला. ४६

**शशाप तान्तदा विप्रान् जमदग्नि कुमारकः ।**
**कदन्न भोजिनो यूयं चैलखंड धरा भुवि. ४७**

तेव्हां त्या ब्राम्हणांस परशुरामानें तुह्मी कदान्न [ वाईट अथवा वाईटांचें अन्न ] खाणारे फाटकी वस्त्रें पांघरणारे असे या पृथ्वींत व्हाल असा शाप दिला. ४७

**अ प्रसिद्धावनि स्थाने श्लाघनीया भविष्यथ ।**
**शप्त्वेत्थं भार्गवो रामो महेंद्रं तपसे ययौ. ४८**

जेथें विद्वान् लोक नाहींत आशा पृथ्वींत तुह्मी मान घेण्यास योग्य अथवा या पृथ्वींत अप्रसिद्ध आणि अश्लाघनीय म्हणजे मान घेण्यास योग्य नाहीं असे व्हाल असा शाप देऊन तपा करितां महेंद्रगिरिस राम गेला. ४८

**गते तु भार्गवे रामे तत्क्षेत्रस्था द्विजातयः ।**
**शापग्रस्ताः सुदुःखार्ता शूद्रप्रायास्ततोऽभवन्. ४९**

भार्गवराम गेल्यावर त्याच्या क्षेत्रांत राहाणारे ( परशुराम कृत ब्रांम्हण ) शापानें गिळलेले फार दुःखानें पीडित होऊन मग शूद्रासारखे झाले. ४९

ते कसे अशी शंका उत्पन्न होते. या विषयीं सह्याद्रि खंडाच्या उत्तरार्धांत दुसऱ्या अध्यायांत विशेषच सांगितलें आहें ते श्लोक.

**योजनं शत विस्तीर्णं कोंकणभिति नामतः ।**
**देशंच केवलं नष्टं चांडालजन सेवितं. १८**

अर्थ. देश जे वर्णिले आहेत त्यांत केवलच नष्ट. चांडालजन सेवितं [ भरलेलें ] असें नावानें कोंकण ज्याला म्हणतात तें. श्लोक.

**तत्रैव वासकारिा च पयो ब्राह्मणाः खलु ।**
**श्राद्धे वा मौंजिकर्मे वा मांगल्ये वा सुकर्मसु. १९**

अर्थ. तेथें राहणारे ब्राम्हण निश्चायक पयः [ पातकी ] आहेत. श्राद्ध अथवा मौंजींत अथवा कोणत्यांही मांगल्यांत अथवा उत्तम कर्मांत. श्लोक.

**आगताः पतयो विप्राः कार्यनाशो नसंशयः ।**
**वर्जयेत् सर्व कर्मेषु सर्व धर्म विवर्जिताः २०**

अर्थ. पातकी ( शापदग्ध ) ब्राह्मण आले की कार्यनाश झालाच यांत संशय नाही सर्व धर्मांतून वर्ज केलेले [ परशुरामानेंच ] ते सर्वकार्यांत वर्जावे. श्लोक.

**चांडाल ब्राह्मणाश्चैव तेषांनप्राह्यवंजलं ।**
**इति कौंकणजा विप्राः दुष्टदेशे समुद्भवाः २१**
**कुचैलाचारहीनास्ते सर्वकार्येषु वर्जयेत.**

अर्थ. असे कोंकणांत उत्पन्न झालेले दुष्ट देशांत झालेले चांडाल ( स्वकर्म त्यागी ] ब्राह्मण होत यांचे पाणी घेऊं नये ( पीण्यास घेऊं नये ) ते आचारहीन वाईट वस्त्रे पांघरणारे आहेत ते सर्वकार्यांत वर्जावे [ वर्जकरावेत म्हणजे घेऊंनयेत ] २१ असे अपात्रीं. दक्षस्मृति अध्याय ३ श्लोक २७

**विधि हीने तथाऽपात्रे यो ददाति प्रतिग्रहं ।**
**न केवलं हि तद्व्यर्थं शेषमन्यत्र नश्यति ॥**

अर्थ विधि हीन, तसेंच अपात्र यांच्या विषयीं जो देतो तो प्रतिग्रह [ घेणें ] व्यर्थ इतकेंच नाहीं दात्याजवळ आणखी शेष असेल त्याचाही नाश कर्ता होईल. अत्रिस्मृति अध्याय १ श्लोक १४९

**अपात्रेष्वपि यद्दत्तं दहत्यासप्तमं कुलं ।**
**हव्यं-देवा नगृह्णंति कव्यंच पितरस्तथा ॥**

अर्थ अपात्रीं दानदिलें तें सातकुळें जाळतें त्याचें हवनादिक देव घेत नाहींत, पिंड उदक पितर घेत नाहींत.

**ते शापग्रस्त झाले कुटिलाचरणेंचि शूद्र जातींहीं ।**
**सम परि न सुखभाव धृत ब्रह्मत्वास सोडिलें तींहीं ८**

ते आपल्या कुटिल [ वाकड्या ] आचरणानें शापाच्या तोंडांत सांपडून शूद्रजातींच्या बरोबर झाले. परंतु सुस्वभाव नाहींत ( शूद्र मुळचे वेदाचार हीन ) परंतु सुस्वभाव आहेत तर त्यांजला ही ईश्वरप्राप्ती आहे. श्रीमद्भगवद्गीता अध्याय ९ श्लोक

**मां हि पार्थ व्यपाश्रित्य येपिस्युः पापयोनयः ।**

**स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेपि यांति परांगतिं ३२**

अर्थ स्त्रिया आणि वैश्य, शूद्र आणि त्यांपलीकडील चांडालादिक पापयोनी जे तेही मला भजून आश्रय करून असले तर अर्जुना तेही परमगतीला पावतात ( कारण सरळ भावानें भजतात ) ह्मणून आतिहीन जातीहून कमी या धारणेंमुळेंच धरलेल्या ब्राह्मणधारणेस त्याहीं सोडिलें ( सोडणें भाग झालें )

**महाराज छत्रपतिच्या अष्टप्रधानांत पेशवा झाला ।**
**चित्पावन तन्मंत्री बाळाजी आग्रहीं भरी त्याला ९**

महाराष्ट्र छत्रपति [ सातान्याचे राजे श्रीमंत शिवाजी महाराज भोसले हेमाद्रि प्रबंध अध्याय ३१ षण्णवती ह्मणजे शाहाण्णव कुळें राज्यांचीं सांगितलीं आहेत तो सारा अध्याय न घेतां संबंधा पुरतेच श्लोक घेतों. बाळाजी आवाजी चांद्रसेनीय कायस्थ प्रभु त्या महाराजाचे प्रधान चिटणीस चित्रे उपनामक होते त्यांहीं श्रीमान् गागाभट्ट न्यायशास्त्रादि शास्त्रनिपुण यांच्या मतानें महाराजांचें मौंजी बंधन करऊन राज्याभीषेक करविला होता, त्यामुळें चित्पावनवृत्तीस वाईट वाटून बाळाजी प्रभूंचा धर्मसंबंधीं द्वेष उत्पन्न झाला. परंतु ते महाराज क्षत्रियवंशी होते. त्या संबंधीं एक हा आधार आहे. हेमाद्रि प्रबंध अध्याय ३१ यांतील श्लोक

**द्रविडाचार्योवाच. पुरूरवा बुधस्यासीदायुस्तस्य सुतोऽभवत् ७**
द्रविडाचार्य सांगतात बुधास पुरूरवा पुत्र होता त्याचा पुत्र आयु झाला. ७

**क्रोष्टातस्यात्मजः प्रोक्तो नहुषस्तस्य चात्मजः ।**
**ययातिस्तस्य पुत्रोभूत् अष्टाः पुत्रास्ततोऽभवन् ८**
त्याचा पुत्र क्रोष्टा त्याचा पुत्र नहुष त्याचा पुत्र ययाती त्यास आठ पुत्र झाले. ८
[ यांत यदु आणि कुरु हे दोन वर्णित आहेत. ]

**पुत्राष्टकं ययातेश्च यदुस्तस्यैव यादवाः ।**
**कुरोस्तु कौरवा प्रोक्ताः शर्मिष्टा देवयान्यनः ९**
ययातीच्या आठ पुत्रांतला यदु देवयानीं पासून त्याचे यादव शर्मिष्टेपासून कुरु त्याचे कौरव ९ हे दोन यां शीवाय साहाजणे राहिले त्यांच्या मातांचीं आ.णि त्यांचीं नांवें.
स्त्रि० चारा ३ मधुरी ४ परमारा ५ राष्ट्रकी ६ धामपाळा ७ अनंगा ८
पुत्र. चव्हाण ३ मधुरीय ४ परमार ५ राष्ट्रकुंड ६ धामपाळ ७ अनंग ८

यादवानां तु संप्रोक्ताः भेदा द्वादश तान् क्रमात् ।
हेमाद्रे कथयिष्यामि समासेनच तान् शृणु १४

यादवांचे बारा भेद सांगितलेले हेमाद्रे ते सकल सांगतों ते क्रमें करून ऐक थोडक्यांत १४

वृष्णिश्चांधक भोजश्च सावंता जाधवस्तथा ।
अर्बुदा माथुरीनामा शूरसेनो वितर्दनः १५

वृष्णि १ अंधक २ भोज ३ सावंत ४ जाधव ५ अर्बुद ६ माथुरी ७ शूरसेन ८ वितर्दन ९ १५

कुकुरः कैतवश्चैव यादवा द्वादशैव ते १९॥

कुकुर १० कैतव ११ यादव १२ बारा ते असे. १९॥

जाधवः सोमवंशश्च चतुर्विंशति पौरुषैः २४

जाधव सोमवंशाचे चोवीस पुरुषाकरून विस्तार होता. २४

लंड भंड पंचपरो गज चामर वंशगा : ।
परमारस्य वंशोपि कलौ कर्दम नामकः २५

लंड १ भंड २ पांचपर ३ गजचामर ४ किंवा गज ४ आणि चामर ५ परमार ६ याचा वंशही कलींत कर्दम [ कदम ] नांवाचा. २५

तस्य भूतहरो राजाचोज्जयिन्यां नृपोभवत् २५॥

त्याचा भूतहर राजा [ भर्तृहरीचाबाप ] उज्जनीचा राजा झाला. २५॥

परमार कुले जातश्चंडसेन महाबलः २७

परमाराच्या कुलांत चंडसेन महाप्रबल झाला. २७

द्वौ पुत्रौ तस्य कुमुदो मुंजो स्यानां कलौयुगे ।
कुमुदस्य सुतो भोजो धारानगर भूपतिः २८

त्याला दोन पुत्र कुमुद १ मुंज २ त्यांचे कलयुगांत कुमुदाचा पुत्र भोज. धारानाच्या नगराचा राजा झाला. २८

चत्वारो भोजपुत्राश्च द्वयोर्वंशे धरातले ३२॥

भोजाचे पुत्र चार त्यांत दोवांच्या वंशांत पृथ्वीवरते ३२॥

**भोजपुत्रो महासेनो शिवभक्तो महामतिः ।**
**भूसलस्तस्य पुत्रोभूद्भोसलाख्यस्तदात्मजः ४६**

( विस्तार होता ) भोजाचापुत्र महासेन नांवाचा मोठा मतिमान शिवाचाभक्त त्याचा पुत्र भूसल आणि भूसलाचा पुत्र भोसल. ४६

**हेमाद्रिरुवाच.—भोजपुत्रो महासेनो शिवभक्तो महामतिः ।**
**महासेनाय किं दत्तं शिवेन निज भक्तितः ५१**

हेमाद्रि पुसतो.— भोजपुत्र महासेन शिवभक्त मोठा मतिमान् त्यानें आपली भक्ति केल्यामुळें शिवानें त्यास काय दिलें. ५१ ( द्रविडाचार्य सांगतात. )

**धराधीशश्च भोजश्च वेदेन स्तवनं कृतं ।**
**भोजस्त्वामिंद्र इत्यादि स्तुत्वा ब्रम्हाण रूपतः ५२**

पृथ्वीपती भोज असें वेदानें स्तवन केलेलें भोजा तुला राजा आदिकरून संबोधनानें ब्रह्मदेवाच्या रूपानें स्तऊन. ५२

**तवपौत्रो भूसलाख्य स्तत्पुत्रो भोसलाभिधः ।**
**दक्षिणास्यां दिशि नृपो महाकीर्ति प्रतापवान् ५३**

तुझा नातु भूसल नांवाचा त्याचा पुत्र भोसल नामा दक्षिणेच्या दिशेंत महाकिर्ति आणि प्रतापवान राजा. ५३

**शिवावतारो भविता सत्यमेतद्ब्रवीमि ते ।**
**अत्र प्रवाण वेदो वै ब्रह्मणा पठितः पुरा ५४**

शिवाचा अवतार होणार ह्मणून ब्रह्मदेवानें वेदच बोलून ठेविला आहे तुला मी खरें सांगतों. ५४

**तवाद्याक्षर मादाय सल वंशो भविष्यति ५४॥**

( भोजास ब्रह्मदेव बोललेला आहे ) तुझें अद्याक्षर घेऊन त्यास सल हें पद जोडून जो शब्द होतो. तो वंश होईल. ५४॥

वरतीं लिहिल्या प्रमाणें भोज या शब्दांतील अद्याक्षर 'भो' घेऊन त्यास 'सल' हा शब्द जोडीला ह्मणजे भोसल असें नांव होतें.

**या संबंधी वेद मंत्र ऋग्वेदीमंत्र संहिता अष्टक ८ अध्याय १**

**भोजमश्वा सुष्ठुवाहो वहंति सुवृद्रथो वर्तते दक्षिणायाः**

अर्थ भोजाला उत्तम रथसहीत चांगले घोडे वाहतील असे दक्षिणेंत वर्ततात ( वर्ततील )

**इति वाक्यबलादेव अश्वानां पतिरद्भुतः ।**

**दक्षिणाया इति पदाद्दक्षिणात्यो भविष्यति ५९**

या वाक्यबळा पासून [ बळानें ] मागें झाला नाहीं असा घोड्यांचा राजा आणि दक्षिणायाः या पदास्तव दक्षिणेचा राजा होईल. ५९ समाप्त

यावरून भोसले राजे क्षत्रियवंश होत असा निश्चय होतो ] यांच्या आठ प्रधानांत पेशवे झाले ते चित्पावन किंवा त्यांचा मंत्री बाळाजी जनार्दन ऊर्फ नाना फडणीस चित्पावन त्याला आग्रहांत भरिता झाला. ९

**त्याणें या राजर्षी कुळास बहुसाल हो दिला ताप ।**

**कर्मी धर्मी केला लोप असें फार जोडिलें पाप १०**

त्याणी या राजऋषीच्या कुलास फार ताप दिला आणि धर्म कर्म यांत लोप केला [ भलतेंच ह्यांचे कर्मे असें ह्मणून तसेंच वर्तऊं लागले ] असें फार पातक जोडिलें १०

**उपनयन वेदग्रहण श्रौतस्मार्तादि कर्म तें भ्रष्ट ।**

**ग्रंथाधार पहाया तेही नुरवी हटें करी नष्ट ११**

मौंजीबंधन वेद ग्रहण ( ॐकार व्याहृती सहीत गायत्री आणि तीनही वेद शिकणें ) श्रौतस्मार्त ( अग्निहोत्र आदिकरून ) कर्मभ्रष्ट करून ग्रंथांचा आधार पाहावा तर ते हट्टानें मुलूक शोधून हात पावला तेथील ग्रंथ नाहींसे केले. उदाहरण पहा श्री रेणुका माहात्म्य [ स्कंद पुराणांतील ] छापलेलें आहे तें छापणारानें जितक्या प्रती मिळविल्या तितक्यांत ४० चाळीस अध्यायां वर अध्याय नाहींत. मी ग्रंथकर्त्यानें तीनवर्षे ह्या ग्रंथाचा धांग लाविण्यास यत्न केला. आणि स्वजाति अधिकारप्रतिष्ठिताहीं [ आत्माराम भिकाजी दांदे एकस्ट्रा असिस्टंट कमीशनर वराड ] मला साह्य दिलें तेव्हां शके [ १६६० ] पंधराशें साठची एक प्रत आणि देशपर्यटन करितांकरितां शके ( १४५० ) चवदाशें पन्नासची प्रत द्रावीड ब्राह्मणा जवळ सापडली ह्या दोनी प्रतींत पंचावन्न अध्याय आहेत ते मी ( ग्रंथ कर्त्यानी ) आपणापाशी संग्रहास ठेविले आहेत. ११

**अत्याग्रह स्वीकारा करुनि जई दूषिलेंचि पुण्याख्यीं ।**
**पत्तनिं चित्पावननिं तैं श्रीराम प्रतिष्ठ होय पुण्याख्यीं १२**

अत्याग्रह धरून चित्पावनाहीं जेव्हां पुण्यांत दूषण लाविलें तेव्हां अनाचार न साहे ह्मणूनच रामाचार्य या उत्तम नामाच्या ठाईं श्री परशुरामच प्रतिष्ठ होऊन त्याणे क्षत्रियांचा पक्ष स्वीकारिला. १२

**तैलंगदेश वासी जो हो पंडित वेद शास्त्रज्ञ ।**
**श्रीमद्रामाचार्य हीरीं तो हो जसा घन तदज्ञ १३**

तैलंगदेशी राहणारा वेद शास्त्र पुराण जाणता श्रीमान् रामाचार्य पंडीत ह्मणजे चारीवेद साहाशास्त्रें व्याकरण १ न्याय २ मीमांसा ३ सांख्य ४ पातंजलि ५ आणिवेदांत ६ आणि सर्वपुराणें जाणता अशा त्याच्या पांडित्यास न जाणून त्या हिऱ्यावर नानाफडणीस घन ( लोखंडाचा घण ) पडला. १३

**तन्मत सहाय केलें टकलोपाव्हें धरुनि काम मनीं ।**
**प्रभुकुल आचार्यत्व त्या झालें प्राप्त त्याकृतींत जनीं १४**

त्या रामशास्त्री बावांच्या मताला अनुसरून टकले उपनामक "चित्तपावन" जे वरती सह्याद्रि खंडाच्या उत्तरार्धांत अध्याय पहिला श्लोक ३२. सारखालीं पृष्ट १२८ वर लिहिले आहेत त्यांचीं उपनामें ज्यांत सांगितलीं आहेत तो हेमाद्रि प्रबंधाचा अध्याय २० ह्यांत संख्या २०८ ही ४४ साव्या श्लोकांत सांगितली आहे ती ह्या ग्रंथांत ह्या अध्यायाच्या पस्तिसाव्या आर्ये पुढें लिहिली आहे त्या २०८ आंतील श्लोक २६ यांत नावें सांगितलीं आहेत तीं. श्लोक

**दातार दातीर सहस्त्रबुद्धे साहस्त्रबुद्धिः करवंदिकारः ।**
**पारंजिपे मोडक नामजोसी गोंडे वडीये टकले भिडेच २६**

ह्या श्लोकांत "टकले" हें नांव ज्यांचें आहे ते "चित्पावन" नव्हेत याणी आपल्यास आचार्यत्व प्राप्तव्हावें ह्या हेतुनें साह्यकेलें त्यावेळेस प्रभुकुलआचार्यत्व त्यांस पूर्ण प्राप्त झालें असा निश्चय होतो. १४

**तत्कृत निश्चय बहुमत जो तो लिहिला असे अधो भागीं ।**
**ऐशा सुकृतीचें पद योग्य कथिनतें अहो बधोभागीं. १५**

त्या रामशास्त्री बावांनी केलेला निश्चय या खालीं लिहिला आहे तो पहा अशा उत्तम

कृति पुरुषाचें योग्यपद. [ अधिकारस्थान ] तें अभागीं ( हलक्या स्वभावाच्या लोकांत ) न बधो [ न प्राप्त होवो. ] १९

**वाराणसी पुरींत वसते पंडीत जे तिहीं पत्र ।**
**हरदक्दिक्प मितैर्यद्दतं शुचि तद्दिकाशितास्त्यत्र. १६**

वाराणसी पुरींत ( काशींत ) रहाणारे पंडीत ऱ्याऐंशी संख्यानीं जें पत्र दिलें तें शुद्ध येथें लिहून प्रकाशित केलें आहे. १६

**यांत आग्रह पुरःसर शंका घेतल्या होत्या त्या खालीं लिहून दाखवितों.**

१ क्षत्रिय कुल मुळींच राहिलें नाहीं. भागवतांतील वचन " नंदांतं क्षत्रियं कूलं क्षत्रियत्व मनीनशेत् " ह्याचा अर्थ करितांना नंदराजा पावेतों क्षत्रिय कुल होतें. पुढें नष्ट ( नाहींसें ) झालें असा घेतला आहे. परंतु " क्षयित्रत्व असें पद यांत आहे. क्षत्रियपणा जाईल असें पद जर आहे तर धारणा जाईल. मनुष्यच नाहींसें होईल असें नाहीं. प्रजापालन अधिकार जाईल असें होतें.

२ कायस्थ पातकी झाले आहेत. पाराशर स्मृति. " **कपिला क्षीर पानेन ब्राम्हणी गमनेन च वेदाक्षर विचारेण कायस्थ पतितो भवेत्** " अर्थ. गाईचें दुध प्याल्यानें, ब्राह्मण स्त्री संभोगास घेतल्यानें, वेदाक्षराचा विचार केल्यानें, कायस्थ पातकी होतो. याचें उत्तर पुरतें आहे.

३ कोणतेही जातीनें अयोग्य कर्म अयोग्य अधिकार धारण केला म्हणजे जाति नाहींसी झाली. [ यास वाचनीक आधार घेतला नाहीं. तरीं अशीं वचनें पुष्कळ आहेत. ) याचें उत्तर पुरतें आहे.

४ एक दाल्भ्यगोत्रच सर्वांचें आहे. परस्परांत विवाह केल्यानें ( सप्रवर संबंध झाल्यानें ) कर्म हानी झाली.

५ चित्रगुप्त ब्राम्हण [ ब्रम्हदेवापासून झालेला ] त्याची कन्या वरिली तेव्हां तीजपासून झाले ते प्रतिलोम होत.

६ चांद्रसेनीय कायस्थ जे म्हणावयाचे ते कोणते.

७ कायस्थ हेच आहेत तर यांजला प्रभु नांव कां पडलें.

८ चंद्रसेना एका पुरुषाची उत्पत्ती यांहीं मुली कोणाच्या केल्या.

ह्या शंका आणि आक्षेप आहेत. यांजवर उत्तरें आणि निर्णय या खालीं लिहिलेल्या पत्रांत केला आहे. याच्या पूर्वी कांहीं पत्रें झालीं आहेत पण यांतील स्पष्टीकरणें पूरीं आहेत.

प्रथम वरतें श्रीकार आणि मायना लिहून पुढें शास्त्रार्थ संबंधी जें लिहिलें तें. ह्यांत संस्कृताचा अर्थ आणि कंसांत लिहिलेला मजकूर हे ग्रंथ कर्त्यांचे आहेत असल प्रतींत नाहीं, हें लक्षांत ठेऊन वाचावें.

**पत्रांतील लेख. आणि ग्रंथकारकृत अर्थ.**

**कायस्थास्त्रिविधाः प्रोक्ताश्चित्रगुप्तास्तथापराः ।**
**दाल्भ्यगोत्र क्षत्रजास्तु त्रीतीयाः संकरात्मजाः**

कायस्थ तीन प्रकारचे सांगीतले आहेत. चित्रगुप्त कायस्थ, १ दाल्भ्य गोत्री क्षात्रिज २ तीसरे संकरात्मज ३ असे तीन प्रकारचे आहेत.

**तत्र चित्रगुप्ताद्युत्पत्ति पद्म पुराणें.**

त्यांत चित्रगुप्त पाहिले त्यांची उत्पत्ति पद्म पुराणांत [ सृष्टी खंड.]

**सृष्टयादौ सद्सत्कर्म ज्ञप्तये प्राणिनां विधिः ।**
**क्षणं ध्यानस्थितस्तस्य सर्वकायाद्विनिर्गतः ॥**

सृष्टी उत्पन्नकरण्या पूर्वी प्राण्यांचें बरें वाईट कर्म समजण्या करितां कांहीं उपाय झाला पाहिजे असें मनांत आणून ब्रह्मदेव क्षणभर [ घटि. प्रत्येक साठपळांची घटि त्या दोन घटिका भर ] ध्यान धरून बसले तों त्याच्या सर्वदेहा पासून निघाला ह्या काया पासून निघाला तो त्यांत होता ह्मणून कायस्थ.

**दिव्यरूप पुमान्हस्ते मषीपात्रं च लेखनी ।**
**चित्रगुप्त इति ख्यातो धर्मराज समीपतः**

देवलोकींचें रूप पुरुषाकृति हातांत दवुत आणि लेखणी. नांवानें चित्रगुप्त [ अपूर्व जपून बाळगणारा ] धर्मराज [ यमधर्म ] याच्या जवळून. २

**प्राणिनां सद्सत्कर्म लेख्याय स नियोजितः ।**
**ब्राह्मणातींद्रिय ज्ञानी देवाग्न्यो यज्ञभुक सदै. ३**

प्राण्यांचें बरें वाईट कर्म [ जें होईल तें ) लिहिण्या करितां योजित केला. ते

चित्रगुप्त ब्राह्मण इंद्रियजित ज्ञानी देव अग्नि प्रमाणें यज्ञ संबंधी हविर्भाग घेणारा. ३

**भोजनादौ सदा तस्मै आहुतिर्दीयते द्विजैः ।**
**ब्रम्हकायोद्भवो यस्मात्कायस्थ ज्ञातिरुच्यते. ४**

भोजना पूर्वी सार्वकाल त्याला ब्राह्मण क्षत्रिय वैश्य यांणी आहुती द्यावी ब्रम्हदेवाच्या काया [ शरीरा ] पासून झाला ह्मणून त्याची जात कायस्थ म्हणतात. ४

**नानागोत्राश्च तद्वंशाः कायस्था भुवि संति वै.**
अनेक गोत्रांचे कायस्थ त्या वंशाचे पृथ्वीवर आहेत.

**इति चित्रगुप्त कायस्थोत्पत्तिः ।**
**पद्म पुराणोक्ता उक्तंच गोविंदभट्टर्या.**

असी चित्रगुप्त कायस्थांची उत्पत्ती पद्म पुराणांत सांगितली ती गोविंद भट्टीत [ गोविंद भट्ट ग्रंथ कारानें केलेल्या पोथींत ] सांगितली आहे. हे गोविंद भट्ट गागा भट्टाचे पूर्वजांतील साहावे पिढीचा मूळ पुरुष.

**अथ क्षत्रिजोत्पत्तिः स्कंदपुराणे रेणुकामाहात्म्ये स्कंद उवाच.**
**एवं हत्वार्जुनं रामो इत्याद्य व्रत तीर्थ रताः सदा पर्यंत कथा माग्लेखने रेणुका माहात्म्ये सप्त चत्वारिंशत्यध्याये लिखितास्ति साकथापश्यध्वं तथाचापरे श्रीमच्छंकराचार्य कृत निर्णयेप्यग्रे विलिखामि.**

आतां क्षत्रियापासून झालेली उत्पत्ति स्कंद पुराणांत रेणुका माहत्म्यांत स्कंदा ( षडानना ) च्या भाषणांत असा अर्जुनाला मारून राम येथपासून व्रत तीर्थ या कामांत सार्वकाल रत येथपर्यंत कथा पूर्वी लिहिलेल्या रेणुका माहत्म्याच्या सत्तेचाळीसाव्या अध्यायांत लिहिली आहे ती पाहावी. तशीच दुसऱ्यानें श्रीशंकराचार्यांनीं केलेल्या निर्णयांतहि पुढें मी लिहीन.

**व्रत तीर्थ रताः सदा या श्लोका पुढें**

**क्षत्रियाणामयं धर्मो कृतं मौंजी निबंधनं ।**
**यत्किंचिद्वैदिकं जाप्य नवग्रह मखादिकं २८**

मौंजी बंधन केलेला. यत्किंचिद्वैदिकं [ सर्व वेद या वाक्याचा विस्तार वर पहिले

अध्यायांत १०१ आर्येच्या अर्थांत या ग्रंथाचे पृष्ट ६०-६१ यांवर दाखविला आहे ] सकल पूर्ण वेद म्हणात्रे जप करून नवग्रहादिक यज्ञ करावे. २८

**नाना शांतिश्च विधिवदृत्विग्भिरेव कारयेत् ।**
**षण्णाच कर्मणा मध्ये त्रीणि कर्माणि जीविकः २९**

नानाशांति विधि सांगितले आहेत तशा ऋत्विजां [ उपाध्याय ह्मणजे जो शिष्यांस वेदांचा एकादा भाग शिकवितो तो. आणि ऋत्विज ह्मणजे यज्ञ यागादिक मात्र कर्मे करितो तो. या विषयीं याज्ञवल्य स्मृति आचाराध्याय श्लोक ३५ तसाच. गर्भाधाना पासून उपनयना पावेतों संस्कार करून शिष्यास वेद पढवितो तो गुरु. आणि उपनयन विधि मात्र करून शिष्यास वेद पढवितो तो आचार्य. या विषयीं श्लोक ३४ हे पहा ह्यांत गुरु १ आचार्य २ उपाध्याय ३ आणि ऋत्विक् ४ याप्रमाणाने पूज्य आहेत. पण या सर्वांहून माता अधीक पूज्य आहे. ह्या अर्थाचे हे ३४ ३५ श्लोक आहेत. गुरु शब्दानें पिता मानण्यास आधार चांगला होतो, जेथें पिता आणि माता यांच्या संबंधानें उच्चार करण्याचा संबंध येतो तेथें माता पिता असा शब्द घेतात यास कारण हेंच असावें. वरती उपपत्ती केली ह्यांतील ऋत्विजां ] कडून करवाव्या सहा कर्मे यांतून तीन यजन १ आध्ययन २ आणि दान ३ या कर्मानें उपजीविका करितात. हा क्षत्रियांचा धर्म. २९( ह्यग्रंथांत पृष्ट ६१ आर्या १०२ हिची उपपत्ती पृष्ट ७५ पावेतोंपहा )

याप्रकारें प्रभू चांद्रसेनीय कायस्थ दाल्भ्यरक्षित यांची उत्पत्ति मोठ्यांचा आग्रह बहुत च पडेल तेव्हां शास्त्ररावून त्यांची समजावीस करणें प्राप्त ह्मणून. क्षत्रियत्व निराकरणार्थ एक भागवतांतील वाक्य लिहिलें तें कोणतें तर " **नंदांत क्षत्रियः कूलं क्षत्रियत्वमनीनशेत.** ? १ " याचें उत्तर ह्या वाक्येंकरून सर्वक्षत्रिय मेले असी गोष्ट कसी घडेल. वाक्यार्थ काय ह्मणाल तर नंदराजा पर्यंत क्षत्रिय व्यवहार पुढें जाईल. [ व्यवहार हा शब्द जगतांत वर्तमानीं ज्या गोष्टी घडतात त्यांस दाखविणारा आहे. नंदराजा पर्यंत क्षत्रियांचें कर्म राज्यशासन प्रजापालन आणाखि धनुर्धारण करीतहोते पुढें राज्य क्रांती झाल्यामुळें क्षत्रिय व्यवहार गेला. असा भावार्थ. ]

शरीरस्थ गर्भ मागीतला ह्मणून कायस्थ व्यवहार [ ह्या शब्दांत नांवसांगणें असा अर्थ आहे. ] क्षत्रिय परियाय प्रभू व्यवहार झाला ह्मणून ज्ञाती नष्टझाली ? न ( हें ज्ञाती नष्ट न झाली असें अर्थानें उत्तर आहे ) तसा दुराग्रही पुरुषांच्या समजाविशी करितां वैदीक कर्म

निषिद्ध एक पाराशर स्मृतीचा चतुर्थ चरण भलताच अर्थ घेऊन गागाभट्टी लिहिली ती कोणती ह्मणाल तर " **कपिला क्षीर पानेन ब्राम्हणी गमनेनच । वेदाक्षर विचारेण कायस्थ पतितो भवेत् !२** " याचें उत्तर अशीच जर स्मृती आहे तर सामान्यतः कायस्थ त्र्यांसही निषेध झाला. तेव्हां ब्रह्म कायस्थासही निषेध होईल. आणि मूळची पाराशर स्मृती ग्रंथ काढून पाहिला तेथें या स्मृतीचा चतुर्थ चरण " **शूद्रो चांडालतां व्रजेत्** " असा आहे. ( गागाभट्टांचे पूर्वजांपैकीं कमलाकर भट्टानीं शूद्रकमलाकर नावाचा ग्रंथ रचिला आहे त्यांत हा श्लोक घेतला आहे तोही अनेकवेळ उल्लेखित आहे तो पाठ " **कपिला क्षीर पानेन ब्राह्मणी गमनेनच । वेदाक्षर विचारेण शूद्रश्चांडालतां व्रजेत्** " सांप्रत शके १८०६ साली रा. रा. रावजी श्रीधर गोंधळेकर यानी पुणें शहरांत " जगद्धितेच्छु " नाम छापखान्यांत या ग्रंथाची प्रत छापली आहे तींत पत्र ३ पृष्ट २ पंक्ति ४ आणि पत्र १४ पृष्ट २ पंक्ति १० ११ येथें पहा " कायस्थ पतितो भवेत " असा नाहीं. ) वैदिक [ वेदोक्त ] कर्म निषेधक वचन एकच लाविलें. आणखी निषेधक वाक्यच नाहीं. स्मृति तात्पर्यार्थ वर्णत्रयास विधि वैदीक कर्माचा सिद्धच आहे. शूद्रांस मात्र निषेध आहे. अन्य संकर जातीमांचा शूद्रांत अंतरभावें करुन ( समावेश केल्यानें ) ह्या तीनही निषेधक [ निषेधित ] होतात. चतुर्थ चरणीं अर्थ कसा कल्पिला तर शूद्रादिकांस निषेध नाहीं असें होईल ह्मणून कल्पितांच नये. **अतएव गागाभट्टानीं त्याच पद्धतींत विपेर्पी वैदीक मंत्र स्पष्ट लिहिलेच आहेत.** पूर्वी स्व जातींत लहानथोर अनाचार होतेच त्यामुळें ज्ञातीअविहित कर्माधिकारें ( जाती जातीस जे अधिकार योग्य नाहींत ते चालविल्यानें ) ज्ञाती हानी झाली!३ याचें उत्तर हे कळयुग परत्वें सर्वज्ञातीमध्यें अनाचार असतच आहेत ते कोणते ह्मणाल तर करनाटक प्रांतीं ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण चांगले आहेत. त्यामध्यें प्रत्यक्ष बहिणीची कन्या [ भांची ] मामा समागमें विवाह होऊन संतती होते. हें लौकीक विरुद्ध. शास्त्र विरुद्ध सर्वथा ( सर्व प्रकारें ) अनाचार आहे. असें असतां त्यांचे षट्कर्माधिकार व ज्ञातीहानी झाली? मिश्र मैथिल ( मिथुला जनकराज्याजी नगरी येथें याज्ञवल्क्य ऋषी विश्वामित्र क्षत्रिय वंशज हेमाद्रि प्रबंध अध्याय २०

**विश्वामित्रो गाधिभार्या सुतोयं तस्माल्लोके कौशिकाख्यो बभूव ।**
**यस्माज्जाता याज्ञवल्क्यादयो वै धर्तारो ये ब्रम्हवंशस्य नूनं १**

अर्थ विश्वामित्र गाधिच्या स्त्रियेच्या पोटीं झाला ह्मणून कौशिक नाम पावला. ज्याजपासून याज्ञवल्क्यादिक ब्राह्मणवंश ब्रह्मकर्म धारण कर्ते झाले त्यांतील याज्ञवल्क्य यास ऋ-

चित्रनाहीं धर्मकसे ते विचारल्या वरून त्याणी जे सांगितले तें धर्मशास्त्र याज्ञवल्क्य स्मृति जेथें सांगितली तें पुण्यसील गांव जें तेथें राहणारे ) यांचे ज्ञातीमध्यें प्रथम पंचवीस वर्षांची कुमारी व नंतर विवाह होऊन संतती होते. हाही मोठा अनाचार लोक विरुद्ध अनाचार आहे! [ येथें लोकविरुद्ध आचार आहे असें असून लिहिलें असें समजून वाचावें तें बरें लागतें ] उत्तर देतों नाहीं. तेव्हां प्रभूंची कसी होईल.

एकच दाल्भ्य गोत्र या गोत्रींच सर्व विवाहादि कर्मे होतात ह्मणून ज्ञाती आणि कर्म हानी झाली ४ ? ह्याचें उत्तर ज्या ऋषीचा जो वंश तो ऋषी त्या वंशाचें गोत्र. क्षत्रिय वर्ण भिन्न क्षत्रियांस गुरु गोत्रें प्रसिद्ध आहेत. दाल्भ्य ऋषीनें पालन करून उपदेश ही केला. म्हणून दाल्भ्य गोत्र लागलें. एतावतः बाध नाही. पूर्वी सोमवंशी, सूर्यवंशी, इत्यादि व्यवहार चालत होते. असे सांप्रतही अमुक कुळींचें इत्यादि व्यवहार. कुल आणि वंश यांत शब्द भेद मात्र आहेत. अर्थभेद नाहीत. चंद्रसेन राजा याचा पुत्र सोमराज यास चित्र गुप्त ब्रम्ह कायस्थ याच्या वंशजाची कन्या विवाहांत दिलेली. त्या जाये पासून संतती झाली. ते प्रतिलोम ?९ ह्याचें उत्तर "**ब्राह्मण्यां क्षत्रियात्सूतो**" इत्यादि वाक्यें करून सूत ज्ञात प्रति लोमा पेक्षां उत्तम. "**प्रतिलोम इदं अंगीकृत्य**" इत्यादि न्यायेन वस्तुतः ब्रह्मदेव शरीरापासून उत्पन्न झाला ह्मणून तो ब्रह्म कायस्थ परंतु तो चतुर्वर्णा वेगळा "**देव गंधर्व जाती पुंवत्**" क्षत्रिय राजे याहीं देव गंधर्व यांच्या कन्या बलात्कारें अथवा संतोषें करून विवाहिल्या असें पुराणांतरीं बहूतस्थळीं आढळतें. ( महा भारत व्यास "**भारतो पंचमो वेदः**" ह्मणजे भारत हा पांचवा वेद असें ह्मटलें आहे. त्यांतील आदिपर्व. श्री सूर्यकन्या "**तपति**" नावाची. "**आपव**" म्हणजे वसिष्ट ऋषी यांच्या मध्यस्थीनें "**वसु**" राजा सोमवंशी त्याला उपरिचर ह्मणत होते. कारण. तो अंतरीक्ष गमनी ,ता त्याणें वरिली ह्या करितां अर्जुनाला "**तापत्य**" असें तुमचें सामान्य नाव आहें असें .चित्र सेन गंधर्वानें ह्मटलें आहें. श्रीमद्भागवत. श्रीकृष्णाच्या अष्ट ८ नायका म्हणजे मुख्य स्त्रिया यांतीलच चवथी. "**कालिंदी**" नावाची सूर्य कन्या आदि करून उदाहरणें शोधल्यास बहूत मिळतील ) शुक्राचार्यांनी आपली कन्या **देवयानी** ययाती राजास दिली. तेव्हां क्षत्रिय कायस्थांत प्रतिलोमता नाहीं. उत्तम प्रती सूत यांचा क्षत्रियांत अंतर्भाव करून त्यास ही सर्व क्षत्रिय कर्माधिकार आहे. चांद्रसेनीय क्षत्रिय कायस्थ कोणते ६ ? याचें उत्तर. दाल्भ्य गोत्र दाल्भ्य कायस्थ प्रभू ( येथें दाल्भ्य गोत्री दाल्भ्य रक्षित कायस्थ प्रभू असें वाचावें ) असी आबालवृद्धां पर्यंत ज्यांची प्रसिद्धी आहे ते चांद्रसेनीय कायस्थ ( या ग्रंथान्तः

पहिल्या अध्यायांत. पृष्ठ ९९ सत्याण्णव आर्येपुढें गागा भट्टींतील वाक्य गद्य लिहिलेलें आहे त्या संस्कृताचा अर्थ एथें लिहितों. " परशुरामानें क्षत्रिय वध केल्या वेळीं चंद्रसेन राजाची स्त्री गरोदर दाल्भ्याच्या आश्रमास गेली. तीच्या गर्भाचा वध करण्यास आलेल्या परशुरामास दाल्भ्य मुनीनें प्रार्थिला त्याणें रागानें क्षत्रियत्व सोडवून कायस्थत्व दिलें त्याची संतती तीच दक्षिण देशांत प्रभु नावानें प्रसिद्ध आहे.) तर यांस प्रभु ह्मणण्याची प्रवृत्ती कसी पडली. ७ ! याचें उत्तर. ( स्कंद पुराण रेणुका माहात्म्य अध्याय ४७.

**चत्वारस्तनयो आसन् सोमराजस्य विश्रुतः ।**
**विश्वनाथो महादेवो भानुर्लक्ष्मीधरस्तथा.**

ह्या श्लोकाचे अंक या ग्रंथाच्या पहिल्या अध्यायांत. ९३–९४ यांत अर्थार्थ आहेत. तेथें अर्थ ही पहा. पृष्ट ८४–८९.

**संख्यावानप्यसंख्योभूद्विश्वनाथो महा प्रभुः ।**
**निवास श्री सरस्वत्या रूपौदार्य कलाश्रयः**

वरच्यां प्यापुढें ९४।९९ श्लोकांचे अर्थार्थ आणि अर्थ पहा. )

**स्कंद पुराणें रेणुका माहात्मे ( सप्त चत्वारिंशत्यध्योये ) इत्यं उक्ता**

अर्थ स्कंद पुराणांत रेणुका माहात्मांत असें ( इतकें ) सांगीतलें. महा समर्थ होतो त्यास प्रभू म्हणतात. विश्वनाथ यास सर्वही प्रभू म्हणूलागले म्हणून प्रभू व्यवहार रूढी पडली. सांप्रत ही जाणें जो रोजगार, उदीम, धंदा, केला त्या व्यवहाराचें उपनावच पडतें. तेंच परंपरागत चालतें. तुमचा मुळपुरुष चंद्रसेन पुत्र सोमराज एकच तेव्हां विवाहादि कर्में कोणासीं झालीं ८ ! याचें उत्तर पूर्वी दोन क्षत्रियांचे वंश एक सूर्यवंश एक सोमवंश यांचे-परस्पर विवाह होतच असत यदु, कुरु, पुरु, पंडू, एकाची संतती. यादवाची कन्या सत्यभामा कृष्णास दिली असें बहुतां स्थळीं आढळतें सर्व सृष्टीक्रम असाच आहे. पूर्वी ब्रम्हदेवाच्या शरीरा पासून चार वर्ण उत्पन्न झाले [ हें लोकसमजुती प्रमाणें म्हणजे स्मृत्यादि ग्रंथकार लोक वाक्यार्थ जसा समजतात तशा करितां उदाहरण घेतलें म्हणून योग्य आहे परंतु खरें तत्व याग्रंथाच्या पहिल्या अध्यायांत १२ बाराव्या आर्येच्या अर्थाकरितां दाखविलेले पृष्ट १३–१४ पहा ] तेव्हां मुळपुरुषाची रचना अनादिसिद्ध व्यवहार चालत आला तो खरा. ब्रम्हदेवाच्या दिवसांत दशावतार होतात त्या प्रमाणें पन्नास वर्षें झालीं आहेत तेव्हां कोणते

दिवसांत परशुराम अवतार झाला आहे परमेश्वर जाणे. ( हा व्यामोहक दृष्टांत आहे ) तेव्हां अनादि व्यवहारच प्रमाण. आणखी स्कंद वाक्य.

धारयंते मुखेंगुष्ठो प्रार्थयंतेऽभयं नृपाः ।
स्थितास्तेषां बली रामो दत्तवानभयं तदा.

मुखांत अंगठा घालून प्रार्थना करित राहिले त्या राजानां तो महाबळी राम अभय देता झाला..

तेव्हां आणखी क्षत्रिय राहिलेच होते ते व हे ( एकत्र मिळाले ) सारांश भगवदिच्छेंकरून सृष्टी निर्माण झाली अनादीसिद्ध व्यवहार भगवत्सत्तेनें चालला तोच प्रमाण. ऋषि कुल नदीमूल पाहूंनये. ऋषींची उत्पत्ती पाहतां.

हरणीगर्भ संभूतो ऋष्यशृंग महामुनिः ।
तपसा ब्राह्मणो जातो केन जानेत कारणं.

शृंगी ऋषी हरणीच्या गर्भांत उत्पन्न झाला तो तपानें महामुनी झाला कारण कोण जाणेल.

उर्वसीगर्भ संभूतो वसिष्टश्च महामुनिः ।
तपसा ब्राह्मणो जातो केन जानेत कारणं.

उर्वसीच्या पोटीं वसिष्ठ झाला तो तपानें महामुनी झाला. कारण कोणाच्यानें जाणवेल.

धिवरीगर्भ संभूतो व्यास द्वैपायनो मुनिः ।
तपसा ब्राम्हणो जातो केन जानेत कारणं.

धिवरीच्या गर्भांत द्वैपायन व्यास झाला तो तपानें ब्राह्मण महामुनी झाला. असें होण्याचें कारण कोणाच्यानें जाणवेल.

असे या पृथ्वीच्याठायीं कित्येक निर्माण झाले त्यांचें वर्णन कित्येक ठिकाणीं केलें आहें. विश्वामित्र क्षत्रिय होत्साता ऋषींत मिळाला. तमाच वाल्मीकही कोंकणस्थांचा सप्रवर संबंध होतो. उत्पत्ति पाहतां प्रकारांतरें आहेत. तस्मात् " **कस्य दोषो कुले**

नास्ति. " असें आहे भगवत्कल्प मोडून आपण नूतन मत स्थापूं गेल्यास भगवंतास कसें मानेल ! मानावयाचें नाहीं.

पंडू आणि धृतराष्ट्र यांची उत्पत्ति व्यासापासून पांडवांची उत्पत्ती एका पासून एक असें जगप्रसिद्ध ग्रंथांतरीं वर्णन आहें आणि अश्वमेधादिक यज्ञ केले. त्यांचे घरीं लक्षावधि ब्राह्मण जेवले. स्वर्गीं घंटारव झाले. द्रौपदीस पंच भ्रतार तीणें लक्षावधि ब्राम्हणांस वाढिलें. महासती होय. दोषठेवितां रौरव ( नरक ) प्राप्ती तात्पर्य बलीयसी केवल ईश्वरी इच्छा. विप्राची परीक्षा पाहणारानें पाहूं नये. इत्यलं. शके १७२३ दुंदुभी नाम संवत्सरे.

संमतो यमर्थो माहाराष्ट्राणां अर्थ. महाराष्ट्र ब्राह्मणांचा सम्यक् मान्य केलेला हा अर्थ.

| | |
|---|---|
| श्री गणपतिः | रघुनाथभट्ट राजार्पे धर्माधिकारी प्रांत पुणें. |
| अनंतभट्ट शालिग्राम पुणेंकर. | रामशास्त्री गवादे जुन्नरकर. |
| संमतोयमर्थो बाबाचार्य. पर्यायनाम वेदव्यासस्य गोंदातट पुण्यस्तंभ स्थितस्य. | गोविंदभट्ट कोली पंढरपूरकर. |
| अण्णा नापीकर पुणतांबेंकर. | माधवाचार्य रामडोहकर. |
| श्रीधर दाजी नापिकरः | पांडुरंग दिक्षित प्रतिष्टानकर. |
| जनार्दनाचार्य पुणतांबेंकर. | बाळंभट्ट शेवडे वाईकर. |
| चिंतामण जोशि गिधवे लोहगडकर. | रामचंद्र भट्ट परळीकर. |
| | संमतोयमर्थो दाजी भट्ट ठोके पुण्यस्तंभकर. |

संमतोयमर्थो रामानुजानां द्रविडानां.

| | |
|---|---|
| कृष्ण शास्त्री काशीकर. | विश्वेश्वर बाबा यवतेश्वरकर. |
| सिद्धेश्वर शास्त्री वाईकर. | वेणुगोपाळ शास्त्री पुणेंकर. |
| विश्वनाथ शास्त्री काशीकर. | सुबा शास्त्री वाईकर. संप्रति वस्ति यवतेश्वर |
| बाळकृष्ण बाबा यवतेश्वरकर. | बाल शास्त्री काशीकर. |
| रामस्वामी शास्त्री काशीकर. | व्यंकटेश्वर शास्त्री वज्जटंक काशीकर. |
| राम शास्त्री सातेरकर. | कृष्णाचार्य मालखेटकर. |
| नरसिंहाचार्य ओक. | अनंताचार्य मालखेटकर. |
| व्यंकट कृष्णाचार्य मालखेटकर. | |
| व्यंकट राघवाचार्य रामानुज. | |

संमतोयमर्थो चित्तपावनानां.

विद्याधर जोशी पंचनदीकर.
बाळकृष्ण भट्ट माटे सातारकर.
रघुनाथ शास्त्री बापट.
चिंतामण भट्ट गोखले पुणेंकर.
गजानन भट्ट बोडस टोकेकर.
सखाराम भट्ट अठवले पेणकर.
नरसिंह भट्ट उकुडवे धोमकर.
त्रिंबक भट्ट शेवड्ये पुणेंकर.
यज्ञेश्वर दिक्षित भिडे परशरामकर.
तात्याजोशी चिपळोणकर वस्ती सातारा.
कृष्ण भट्ट परांजपे पुणेंकर.
रघुनाथ भट्ट शार्ङ्गपाणी गुहागरकर.
महादेव भट्ट देवधर पुणेंकर.
महादेव दिक्षित बापट गोळपकर.
मोरभट्ट वझे हरीपूरकर.

बल्लाल शास्त्री अवंध्रकर.
नीलकंठ शास्त्री सातारकर.
धुंडिराज भट्ट खरे बेळणेश्वरकर धर्माधिकारी उपाध्ये.
नीलकंठ दिक्षित बापट गोलवकर
सदाशिव भट्ट करंदीकर पन्वेलकर.
बापू शास्त्री साठेय देवदुर्गकर.
राम भट्ट अभ्यंकर वाईकर.
लक्ष्मण शास्त्री नेनें रेवदंडकर.
गंगाधर शास्त्री गोखले पुणेंकर.
कृष्ण शास्त्री करमलकर.
बापू शास्त्री लेले नायगांवकर.
विठ्ठल भट्ट फाटक पुणेंकर.
लक्ष्मण भट्ट अगासेवाईकर.
विष्णू भट्ट साने वाईकर.
दाजी भट्ट गोडबोले वांयगणकर.

संमतोयमर्थो वाजसनीयानां.

नारायण शास्त्री सिराढोणकर.
विठ्ठल शास्त्री अर्जुनकर श्रोत्री.
अण्णा दिक्षित अयाचित वाईकर.

महादेव शास्त्री कराडकर.
रामचंद्र भट्ट नाना पाठक बोतुरकर.
भिकं भट्ट लोखंडे सासवडकर.

संमतोयमर्थो तैलंगानां कर्नाटकानां.

व्यंकट नारायण शास्त्री कडणेंकर.
कृष्णाचार्य मठकरी.
श्रीनिवासाचार्य हुटालचुशीकर.
रामाचार्य हुलगुंदकर.
नरसिंहाचार्य कटेशूर्पालकर.

नानाचार्य मठकरी संस्थान स्वामी.
राघवेंद्र स्वामी.
नरसिंहाचार्य हुलगीकर.
रामाचार्य सुरसपुरकर.
तीर्थाचार्य बलुगीकर.
बाबाचार्य अद्यमणूरकर.

संमतोयमर्थो कण्वानां करहाटकानां.

सदाशिवोपाध्याय गुर्जर पुणेंकर.
वामन भट्ट खरे कोळवणकर.

विश्वनाथ देव नवाध्ये टोकेंकर.
गणेश शास्त्री नवरे राजापुरकर.

बाळकृष्ण भट्ट पुराणीक हर्डेकर हस्ताक्षर सीताराम भट्ट.

श्री स्कंद पद्म नारद भविष्य आणि कालिका पुराणांत ।
ज्ञातिविवेकीं कात्यायनितंत्रीं कृत असेचि सिद्धांत १७

श्री स्कंद पद्म नारद भविष्य आणि कालिका इतक्या पुराणांत ज्ञातिविवेक कात्याय नितंत्र यांत सिद्धांत केलेला आहेच. १७

श्री याज्ञवल्क्य पाराशर स्मृती परशुधरप्रताप असे ।
गागा आणि गोविंद भट्टी शूद्राब्जकरि पहाच तसे १८

श्री याज्ञवल्क्यस्मृति पाराशरस्मृति परशुरामप्रताप हे आणि गागाभट्टी गोविंदभट्टी शूद्रकमलाकरी हेही सर्वग्रंथ तसेच पहा. १८

ह्या सर्वा ग्रंथातें विलोकितां अर्थसारजें होतें ।
ह्या अल्प संग्रहांत संक्षेपें घेतलें असे होतें १९

अहो ह्या सर्वग्रंथानां पाहतां जें अर्थसार होत आहे तें या लहानशा ग्रंथांत थोडक्यांत घेतलें आहे. १९

या नंतरहि दुराग्रह धरितां धध्योपनाम नीलगळें ।
तन्मत खंडक झाला तत्कृत जगमान्य तें कथूं सगळें २०

असें झाल्यावरही धधे उपनामक नीलकंठ यानी दुराग्रह धरिला तेव्हां त्याच्यामतास खंडन करणारा झाला त्याचें कृत्य जगतास मान्य असें जें तें सकल सांगू. २०

रस वेदोदधि वसुमति मित नृपती शालिवान शककर्ता ।
त्याच्या वर्षांतचि हा उद्भव झाला पुन्हाहि सुख हर्ता २१

रस ६ वेद ४ उदधि ७ वसुमति १ ( पृथ्वी ) संख्या १७४६ शालिवाहन शककर्त्याच्या वर्षांत हा दुःखकारक उद्भव पुनःही झाला. २१

दशमासावधि ऐसा होता झाला विवाद त्यांत सुधी ।
श्रीरामाचार्यानुज राघव आचार्य घे कडास तधीं २२

दहा महिने पर्यंत असा वाद झाला त्यांत उत्तम बुद्धि श्री रामाचार्यांच्या मागून झालेला राघवाचार्य त्या कडा [ पक्षास ] घेता झाला. २२

**स्वाग्रज मतानुगावि तो होउनि शास्त्रार्थ बोलला सदसी ।**
**श्रुतिमंत्र युक्त षोडश संस्काराभाव कां असें वदसी २३**

आपल्या पूर्वी झालेल्या ह्या मताचा अभिमानी शास्त्री त्याच्या मताप्रमाणें चालणारा होऊन वेदमंत्र सहीत सोळा संस्कार करण्याचा अभाव [ अधिकार नाहीं ] असें कां बोलतोस. २३ असें म्हणून सभेंत शास्त्रार्थ सांगितला [ अधिकार आहे या अर्थाचा ]

**तैसाच षट्‌कर्मी त्रिः कर्माचाधिकार क्षत्रांस ।**
**असतां लोपकरा तरि ईश्वर चित्तास पावतो त्रास २४**

तसाच सहाकर्मांतील तीनकर्मांचा अधिकार क्षत्रियांस आहे. असें असून त्याचा लोपकरितां याणी ईश्वराचें अंतःकरण त्रस्त होतें. २४

**त्याचा आशय हो कीं सोळा संस्कार ते समंत्रक हो ।**
**कर्म त्रयाधिकार ऐसा या प्रभुकुला सशास्त्रक हो २५**

त्या ( श्रीराघवाचार्यांचा ) आशयसोळा संस्कार वेदमंत्रानें व्हावेत आणि तीनकर्मांचा अधिकार या प्रभुकुलास आहे हें शास्त्रांतही सांगितलें आहें असा होता. २५

**जो नीलकंठ त्याचा होय अभिप्राय कीं नहो कांहीं ।**
**परि शास्त्राधार नत्या हें ही स्वीकृत असे अनेकाहीं २६**

जो नीलकंठ थत्ते शास्त्री होता त्याचा अभिप्राय असा होता कीं वेदोक्त कर्म व संस्कार काहींही होऊं नयेत परंतु त्या बोलण्यास शास्त्राचे आधार नव्हेत तथापी तें मत पुष्कळांही स्वीकारिलें होतें. २६

**राघवमत विद्वज्जन आदिकरुनि या सभेंत बोलावा ।**
**अथवा निलकंठें हा सशपथ शास्त्रार्थ मिथ्य बोलावा २७**

राघवाचार्यांचें मत विद्वान [ वेदशास्त्रें पुराणें जाणते ] आदिकरून सभ्यगृहस्थ सभेंत बोलाऊन नीलकंठ याणी आपणासीं ( राघवाचार्यापासीं ) वाद करावा जो दुसऱ्यास जिंकून यशघेईल त्याचें मत मान्यकरावें हें एक. अथवा नीलकंठानें स शपथ ( गंगोदक तुलसी हांतांत घेऊन देवळांत जाऊन देवाच्याजवळ ) राघवाचार्यांनें सांगीतलेला शास्त्रार्थ खोटा आहे असें म्हणावें हें दुसरें. २७

किंवा सु महत्क्षेत्रीं पत्रीं आपापल्या अभिप्राया ।
पाठउनी शास्त्रार्थी सह संमति वाटपाहवी याया २८

किंवा उत्तम मोठालीं क्षेत्रें [ श्रीवाराणसी मयसूर, आदिकरून ] येथें आपापल्या अभिप्रायासहीत [ ही गोष्ट ] पत्रांत लिहून पत्रें पाठवावीं आणि शास्त्रार्थ सहीत तेथल्या विद्वान लोकांची संमति काययेते. तीचां वाट पाहवी. २८

जैसी संमति येइल वर्तावें तदनुसार या त्याहीं ।
तीन प्रदर्शित केले मार्ग न एकहि स्विकारिला त्याहीं २९

जसी संमती येईल तसें तुम्हीं व आम्हीं वर्तावें असे तीन मार्ग दाखविले त्यातून एकदेखील त्यांनीं ( नीलकंठाच्या पक्षानीं ) मान्यकेला नाहीं. २९

जैं श्रिजद्गुरुमूर्ति शंकर आचार्य पदिं विराजित ती ।
श्रीमन्नृसिंह भारति आली पुण्यांस जी स शिष्यतती ३०

जेव्हां श्रीसद्गुरूची भूर्ति श्रीशंकराचार्यांच्या पदाच्या ठाईं शोभणारी जी ती श्रीनृसिंहभारती हे शिष्यसमुदाय ( मंडळी ) सहीत पुणें नावाच्या शहरांत आली. ३०

तैं हा वृत्तांत निवेदन केला त्यांस शिष्य वर्यांनी ।
त्याची विवेचन कृति ती त्या स्वीकारिलीच आर्यांनी । ३१

तेव्हां हा वृत्तांत शिष्यश्रेष्ठांहीं निवेदन केला ( ही गोष्ट आरंभापासून शेवट पावेतों सर्व लोकांचे गुरु शंकराचार्य म्हणून त्यांचे शिष्य सारेच समजण्याचे त्यांत कित्येक मोठाले लोकांहीं सांगितली ) तेव्हां शोधून बरें वाईट निवडणें हें विवेचन करण्याचें काम त्या श्रेष्ठांहीं स्वीकारिलें. ३१

केलें शास्त्रार्थालोचन तैंनिर्णय करुनि दिधला हो ।
बलवंत स विठ्ठल प्रभु यां हा अधिकार सर्वविध लाहो ३२

शास्त्राच्या अर्थाचें आलोचन ( विचार सहीत पाहणें ) केलें आणि त्याचा निर्णय ( सिद्धांत ) करुन दिला कीं बळवंत स विठ्ठलप्रभु ( बळवंतराव मल्हार चिटनवीस आणि विठ्ठलराव देवाजी हे मुख्य आहेत यां सहीत सर्व प्रभु ) यांस सर्वविध अधिकार ( वेद पढणें वेदोक्तकर्म अग्निहोत्रादिक होम सोळासंस्कार वेद मंत्रानें करणें करविणें ) हा प्राप्त होवो. [ असा होता तसा ] ३२

**तत्पत्र साग्र लेखन केलेंसे या तळीं पहा प्रभुजी।**
**दत्ताधिकार संपन्मीलित सद्वंश जात वी प्रभु जी· ३३**

तें पत्र सारें ईश्वरीदत्त ( ईश्वरानें दिलेली ) अधिकाररूप संपत्ति मिळालेली जी तें ( आरंभा पासून शेवट पर्यंत ) या खालीं लिहिलें आहे. अहो उत्तम कुळांत जन्मास आलेले प्रभु जनहो ती पहा. ३३




ह्यांतील संस्कृताचा अर्थ आणि शिवाय कांसांतील ग्रंथ कर्त्यानें लिहिले आहेत.

**श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्यत्वाद्यनेक गुण संपन्न पदवाक्य प्रमाण पारीण धुरीण सर्वतंत्र स्वतंत्र यम नियमासन प्राणायाम प्रत्याहार ध्यान धारणा समाध्यष्टांग योगानुष्ठान निरत सकल सुरमुनि निकर मणिमय मुकुट प्रभापुंज रंजित बलित्थेत्याद्यनंतागमेतिहास पुराणानुवर्णित भारती विजयश्चैव संविदानंद एवचेत्याद्यनेक विंशति दुर्वादि परिकल्पित दुर्भाष्य ध्वांत दिवाकराय मान श्री मदानंद तीर्थीय शुभ संप्रदाय प्रवर्तक श्रीमद्रुक्मी सत्यभामा समेत श्रीकृष्ण विठ्ठल दिव्य चरण सरोरुहाराधनैक धुरीण श्रीमदुडुपी श्रीलक्ष्मी मनोहर तीर्थ श्रीपादीय करकमल संजात श्रीलक्ष्मी प्रियतीर्थ श्री चरणैः**

श्रीमान् [ योगरूप ऐश्वर्य ज्यांस प्राप्त आहे असे ] परमहंस [ सन्यासीयांत सर्वाहून श्रेष्ठधर्म ईश्वर तोच आपण असी धारणा भरून ] परि व्राजक ( चालणारे सन्यासी ) आचार्य [ गुरु ] त्व [ पण ] आदि अनेक गुणसंपन्न [ प्रथम आहे असे एकाहून अधीक गुण प्राप्त आहेत असे ) पद [ अधिकार ] वाक्य [ भाषण ] प्रमाण ( सत्य ) पारीण ( शेवटापर्यंतों राखणारे ) धुरीण [ सर्वांपुढें असणारे ] सर्वतंत्र स्वतंत्र ( सर्व कर्म आपल्या आधीन ठेवणारे ) यम [ इंद्रियें आपल्या आधीन ठेवणें ] नियम ( करणें अवश्य तितकें समजून करणें) आसन [ आपान वायुमार्ग रोधन ] प्रणायाम [ प्राणवायू ब्रह्मांडांत भ्रूमध्यस्थानीं स्थिरकरणें ] प्रत्याहार ( नासाग्रीं निश्चल निर्विकार दिष्टी राखणें ) ध्यान [ कल्पित पूज्यदैवत हृदयस्थ सार्वकाल पाहणें ] धारणा ( झालेल्या योगास आणिमादि सिद्धि विघ्नकरून योगनष्ट करितात

त्यांच्या वंशांत न जातां धैर्य धरून असणें ) समाधि [ उपद्रव विकार रहीत होऊन आत्मस्वरूपीं लीन राहणें ] असीं योगाचीं आठअंगें या अनुष्ठानांत रत. सर्वदेव ऋषींचे समूह तेजः पुंजमणि [ उत्तम प्रकारचें रत्न ] तन्मय ( त्या मण्यांचे ) मुकुट यांचे तेजाचे समुह यांस समाधान देत आहेत असे बलित्था [ योगबलोत्कांपित ] असे अनेक आगम ( वेद ) इतिहास पुराणानुवर्णित [ पुराणांत वर्णन केलेले इतिहास भारती ( वाणी ) विजय सम्यक् जाणते आनंद मूर्ति असे आदिकरून शेवट पर्यंत अनेक विंशति [ बहुसंख्य ] दुर्वादिपरिकल्पित ( वाईटवाद करणारे यांहीं कल्पित केलेल्या गोष्टी ) दुर्भाष्य [ दुर्भाषणें ] ध्वांत [ अंधकार) दिवाकरायमान [ यांच्या सूर्या प्रमाणे ] श्रीमत् [ योगश्रीवान् ] आनंदतीर्थीय शुभ संप्रदाय प्रवर्तक [ गुरु परंपरेंतील एक गुरुनाम त्यांच्या उत्तम सांप्रदायनें वर्तन करणारे ] श्रीरुक्मिणी ( भीष्मक कन्या ) सत्यभामा समेत श्रीविठ्ठल दिव्य चरण सरोरुह ( श्रीदेवतेचें चरण कमल ) आराधनैक धुरीण [ आराधकांत एक सर्वांत पुरःसर ] श्रीमदुडुपी श्रीलक्ष्मीमनोहर तीर्थ [ दुसरे एक गुरु ] श्रीपादीय कर कमल संजात ( श्रीदत्तात्रेया प्रमाणे श्रेष्ठ अशांच्या हाता पासून झालेले ) श्रीलक्ष्मी प्रिय तीर्थ ( आणखी एक गुरु ) श्रीचरणैः [ त्यांच्या चरणाहीं ]

**स्वस्ति श्रीमत्सकल धर्म प्रतिपालक यावद्गुण मंडीत राज श्री परम शिष्योत्तम सप्तर्षि नगरस्थ चिटनविसोपाभिधा बलवंतराव मल्हार संज्ञकास्तथापरं दिघोपाख्यां विठ्ठलराव देवाजी प्रभृति समस्त चांद्रसेनीय कायस्थान्प्रभून्प्रति. श्रीनारायण स्मरणपूर्वक अनेकाशिष्या समुल्लसतु तरां अष्ट चत्वारिंशाधिक सप्तदश शत मिते शाके व्यय नाम्ना संवत्सरे फाल्गुनाशीत त्रयोदश्यावधि पुण्याख्य नगरे स्वाश्रमोचित सद्धर्मानुष्ठान परायणाः स्मः युष्मत्कल्याणमिच्छंत स्मात्र-सभा समवेतं शुभकल्पोस्मः अतत्य क्षेमादिज्ञात्वा स्व कुशल ज्ञापनेन वयं भवद्भिः सदा संतोषणीयाः विशेषस्तु.**

स्वस्ति [ सु म्हणजे चांगले मंगल आहां ] श्रीमत् ( ऐश्वर्यवान् ) सकल धर्माचा प्रतिपाल करणारे जितके गुण आहेत त्या सर्वांनी रेखिलेले किंवा भरलेले फार चांगले वर्तमान शिष्य साताऱ्यास राहणारे चिटणीस उपनामक ( ओळखी करितां विशेषेण ] बलवंतराव मल्हार तसेच दुसरे दिघे उपनामक विठ्ठलराव देवाजी मुख्य असे सारे चांद्रसेनीय ( चंद्रसेन पुत्र सोमराज म्हणजे चांद्रसेनी याजपासून झालेले ] कायस्थ प्रभु यांस. श्रीनारायणाचें

स्मरण प्रथम करून तुमचे हर्ष शोभा वृद्धीस पावोत असे अनेक आशीर्वाद. शके १७-४८ व्यय नाम संवत्सरे फाल्गुण वद्य त्रयोदशी पावेतो पुणें येथें आपले आश्रमास उचित चांगले धर्माच्या अनुष्ठानांत रत असून कर्ते. तुमचें कल्याण इच्छिणारे शिष्यसमुदाय सहित शुभ कल्पून आहों. येथील कुशल जाणून तुमचें कुशल आम्हास कळऊन संतुष्ट करणे हें तुम्हाकडून व्हावें. विशेष.

सप्त चत्वारिंशाधिक सप्तदशशत मिताब्दे फाल्गुन मासि श्रीगोदावरी यात्रोद्देशेन करवीर क्षेत्रस्थ पुण्याख्य पुर समीप पर्वते पर्वति ग्रामे श्रीमच्छंकराचार्यान्वय संजाताभिनव श्रीविद्याशंकर भारती स्वामी करकंजोद्भव श्रीविद्यानृसिंह भारती स्वामीनामागमनं समभूत्तत्समये युष्मज्ज्ञातीय शास्त्रार्थ विषये विवादमाना ब्राह्मणा द्वैविध भाव मापन्नाः तत्र वेदशास्त्र निपुण राघवाचार्य रामानुजादिनामेकः पक्षः तथा वेदशास्त्र निपुण नीलकंठ प्रभृतिनामपरः एवं दश मासावधि द्वैधि स्थितं तत्र वेदशास्त्र निपुण राघवाचार्यादीनामाशयस्तु. चांद्रसेनीय प्रभु ज्ञातीयानां धर्मशास्त्र प्रतिपादित समंत्रक षोडश संस्कार पूर्वक कर्म त्रयाधिकारोस्ति. इतरेषां तु स्वीय कल्पनया अधिकाराभावः इति केवलमाग्रहः इति विवादे प्रवृत्ते सति वेदशास्त्र निपुण राघवाचार्यैः श्रीस्वामी संनिधौ चांद्रसेनीय ज्ञातीविषयक निर्णयः चतुर पंडितान्बहुश्रुतान् गृहस्थांश्चाहूय सभा संपाद्यात्र भवद्भिः कर्तव्याः अथवा. वेदशास्त्र निपुण नीलकंठ प्रभृतिभिर्गंगोदकं तुलसींच गृहीत्वा देवागारे प्रविश्य श्री सन्निधौ अयमस्मत्कृत शास्त्रार्थ मृषेति वक्तव्यं. वा स्वस्वमभिप्रायं चांद्रसेनीय न्यायस्थ शास्त्रार्थ विषयक मंथांश्च पत्रे लिखित्वा तत्पत्रं वाराणसी मयसूरादि महत्क्षेत्रस्थ विदुषांप्रति प्रेषयित्वा तत्रत्य विदुषां शास्त्रदृष्ट्या यथा संमतिरायाति तथा वर्तामः इति पक्षत्रयं वासवोपमित पटवर्धनोपाव्हा चिंतामणिराय प्रभृति गृहस्थाशेष विद्वज्जन समूहे प्रतिज्ञातं. तदा तीष्वपि पक्षेष्वन्यतमोपि वेदशास्त्रसंपन्न नीलकंठ प्रभृतिभिर्नांगीकृतः अयं वृत्तांतः अस्मदागमनं यदा संचार क्रमेण पुण्याख्य नगरे जातं तदानीमस्मत्संप्रदायानुयायिभिर्निवेदितः तदविवेचने कृते शास्त्रदृष्ट्याच वेदशास्त्रनिपुण राघवाचार्यादिभिः एवं प्रतिज्ञाते सति अस्माभिस्तदंगीकारमकृत्वा यन्नीलकंठ शास्त्रि प्रभृतयोर्वदंति तत्केवलं द्वेषाभिनिवेशेनैवेति सिद्धं भवति.

शके १७४७ सांत फाल्गुन मासीं श्रीगोदावरीच्या यात्रेच्या हेतूनें करवीर क्षेत्रीं आ-

सणार पुणें शहराजवळ डोंगरावर पर्वती नावाच्या गावीं श्रीशंकराचार्याच्या वंशांत झालेले ज्यां सारखे दुसरे झालेच नाहींत असे श्रीविद्याशंकर भारती स्वामीच्या हस्त कमला पासून झालेले श्रीविद्यानृसिंह भारती स्वामींचें येणें झालें. त्यावेळीं तुमच्या ज्ञातीच्या शास्त्रार्थ विषयांत ब्राह्मण कलह करीत असल्यामुळें दोन तट झाले त्यांत वेद, शास्त्र, निपुण ( प्रवीण जाणता. ) राघवाचार्य रामानुज ( हा ऋग्वेदी ब्राह्मणांतील एक भेद आहे ) आदिकरून याचा एक पक्ष ( तट ) तसा वेद, शास्त्र, निपुण नीलकंठ मुख्य आहे असे जे त्यांचा दुसरा असे तट होऊन दहामहिने पावेतों दोन पक्ष राहिले. त्यांत वेद, शास्त्र, निपुण राघवाचार्यादिकांचा आशय चांद्रसेनीय प्रभु ज्ञातीयांचा वेदानीं शास्त्रानीं सिद्धकरून दिलेला समंत्रक [ वेदमंत्र सहीत ] सोळासंस्कार करणें आणि तसाच तीन कर्मांचा अधिकार आहे. इतरांचा आपल्या कल्पनेनें अधिकार नाहीं. असा आग्रह मात्र ( वेदशास्त्रें पुराणें याचा आधार नसतां ) आहे. असे कलह ( तंटा ) करीत राहिले असतां वेदशास्त्रनिपुण राघवाचार्यांहीं स्वामीजवळ चांद्रसेनीय ज्ञाती विषयीं निर्णय चतुर पंडित ( शास्त्रें जाणणारें ) बहुश्रुत [ फार इतिहास पुराणें आयकिलेलें ] आणि गृहस्थ यांस बोलाऊन सभा भरवावी. हें येथें तुम्हीं करावें. अथवा वेदशास्त्रनिपुण नीलकंठ आदिकरून याहीं गंगोदक तुलसी घेऊन देवळांत शिवून देवा ( आर्चा केलेल्या मूर्ति किंवा शंकराचार्या ) जवळ हा मी [ राघवाचार्यांनी ] शास्त्रांचा केलेला अर्थ खोटा असें ह्मणावें. अथवा आपले आपले अभिप्राय आणि चांद्रसेनीय.कायस्थ यांच्या शास्त्रार्थाचे ग्रंथ पत्रांत लिहून तें पत्र वाराणशी मयसूर [ द्राविड देशींतें विद्वान ब्राह्मण आहेत तें क्षेत्र ] अशा मोटाल्या क्षेत्रांत राहणारे विद्वान ब्राह्मणांकडे पाठवून तेथील विद्वान ब्राह्मणांच्या शास्त्रेंपाहून संमति जशा येतील तसें तुम्ही आम्ही वर्तावें. असे तीन प्रकार इंद्राची उपमा आहे ज्यास अशा चिंतामणराव पटवर्धन मुख्य आहेत ज्यांत असे गृहस्थ आणि सारे विद्वान मंडळींत समजून बोलले ह्मणजे राघवाचार्यांनीं प्रतिज्ञेसारखें भाषण केलें. तेव्हां तीनही प्रकारांतून कोणता एकही मार्ग वेद, शास्त्र, निपुण नीलकंठ मुख्य लोकाहीं अंगिकारला नाहीं. असा वृत्तांत [ घडलेली गोष्ट ] फिरत फिरत येतां आमचे येणें पुण्यास झालें तेव्हां आमचे संप्रदायानें चालणारे यांहीं आम्हास सांगितला. त्याचा विचार करण्यांत शास्त्रें पाहून मनांत आणितां वेदशास्त्र निपुण राघवाचार्यादिक यांनी असें ( जसें ) ह्मटलें आहें तें आम्ही स्वीकारून जें नीलकंठ शास्त्री आदिकरून बोलतात तें केवळ द्वेषांत शिरून असें सिद्ध होईल.

**शास्त्र सिद्धांतस्तु.**

**कायस्थास्त्रिविधा प्रोक्ताश्चित्रगुप्तस्तथापरः ।**
**दाल्भ्यगोत्र क्षत्रजस्तु तृतीयः संकरात्मजः ॥**

कायस्थ तीन प्रकारचे सांगितले आहेत. चित्रगुप्त कायस्थ १ दाल्भ्यगोत्री क्षत्रज [ क्षत्रियापासून झालेले ] २ संकरात्मज दोनजाती मिळून झालेले ३ तिसरे.

**तत्र चित्रगुप्ताद्युत्पत्तिः पद्मपुराणे सृष्टिखंडे.**

**सृष्ट्यादौ सदसत्कर्म ज्ञप्तये प्राणिनां विधिः ।**
**क्षणं ध्यानास्थितस्तस्य सर्वकायाद्विनिर्गतः ॥**

सृष्टी उत्पन्न करण्या पूर्वी प्राणीजनांचें बरें वाईट कर्म समजण्या करितां कांहीं उपाय केला पाहिजे असें मनांत आणून क्षणभर पर्यंत ब्रह्मदेव ध्यानस्थ झाले त्यांच्या सर्वदेहापासून उत्पन्न झाला.

**दिव्यरूप पुमान्हस्ते मषीपात्रंच लेखनी ।**
**चित्रगुप्त इतिख्यातो धर्मराज समीपतः ॥**

देवलोकींचें रूप पुरुषाकार हातांत दउत लेखनी असा चित्रगुप्त नांवाचा धर्मराज [ यमधर्म समीप असतां.

**प्राणिनां सदसत्कर्म लेख्याय स नियोजितः ।**
**ब्राम्हणातींद्रिय ज्ञानी देवाग्न्योयज्ञभुक् स वै. ॥**

प्राण्यांचें बरेंवाईट कर्म ( जें होईल तें ) लिहिण्या करितां योजित केला तो चित्र-गुप्त ब्राह्मण इंद्रियाजित ज्ञानी देव अग्नि प्रमाणें तो ही यज्ञसंबंधी हविर्भाग घेणारा आहे.

**भोजनादौ सदातस्मै आहुतिर्दियते द्विजैः ।**
**ब्रम्हकायोद्भवो यस्मात्कायस्थ ज्ञातिरुच्यते. ॥**

भोजनांपूर्वी ब्राम्हणादि तीन वर्णांनी त्यास आहुती द्यावी ( अशा अधिकाराला पावला ) ब्रम्हदेवाच्या शरीरा ( काया ) पासून उत्पन्न झाला म्हणून कायस्थ ज्ञाती म्हणतात.

**नाना गोत्राश्च तद्वंशाः कायस्था भुवि संति वै ॥**

नाना [ अनेक ] गोत्रें त्यांजला प्राप्त झालीं आहेत असे कायस्थ ( माथुर. गौड. नागर. नैगमआदि असे ) चित्रगुप्त वंशज पृथ्वीचे ठाईं आहेत.

इति चित्रगुप्त कायस्थोत्पत्ति पद्म पुराणोक्ता उक्तंच गोविंद भट्टयां.

असी चित्रगुप्त कायस्थांची उत्पत्ती पद्म पुराणांत सांगीतलेली गोविंदभट्टींत सांगी-तली आहे. गागाभट्टी प्रक० १ पत्र १० पं० १०.

अथक्षत्रजोत्पत्तिस्कंदपुराणेरेणुकामाहात्म्येयथा ॥

पुढें क्षत्रियांची उत्पत्ती स्कंद पुराण रेणुका माहात्म्यांत असी.

स्कंद उवाच. एवं हत्वार्जुनं रामो संधाय निशितान्शरान् ।
अन्वधात्सतान्हंतुं सर्वानेवासुरान्वयान् ॥

असा अर्जुनाला मारून तो परशुराम धारा काढिलेके बाण [ धनुष्यास ] लाऊन अ-सुराचे वंश असे जे [ दैवी संपत्ति ज्यांस नाही ते असुर संपत्ति श्री भगवद्गीता सोळावा अध्याय श्लोक ४

दंभो दर्पोभिमानश्च क्रोधः पारुष्यमेवच ।
अज्ञानंचाभिजातश्च पार्थ संपदमासुरीं.

अर्थ दंभ. ( थोडें धर्म कर्म आचरण करून जगतांत अधीक वर्णविण्याची इच्छा ठेविणें. ) दर्प [ विद्या द्रव्य बल आदिकरून संपन्न मी आहें असें मनीं बाळगणें ] अभिमान [ मी सर्वांत श्रेष्ठ पूज्य मानणें ] क्रोध [ स्वकीय परादिकांस रागानें पाहणें वर्तविणें ] पारुष्य ( बोलणें आचरण यांत मृदुपणा न ठेवितां लोक त्रासयुक्त होत असें असणें ) अज्ञान ( जीत सारासार विचार नाही. असें इंद्रियादि विषयांत राहणें ) असे जे गुण ते असुर संपत्तींत जाहलेल्या मनुष्याचे आहेत. ] सारे त्यांस मारण्यांस त्यां मागून धांवतो.

केचिद्गगनमाश्रित्य केचित्पातालमाविशत् ।
जपस्तुतात्मनःकेचिद्ब्रह्मवेशमधारयन्.

कांहीं गगनाचा आश्रय करून राहिले कांहीं पाताळांत शिरले कांहीं जप स्तुती करूं लागले कांहीं आपल्यास ब्राह्मण वेश धरून रक्षिते झाले.

बभूवस्तापसा केचिद्वनमाश्रित्य तद्भयात् ।
तत्रैवावस्थिता केचिन्द्भूवुर्नट नर्तकाः

कांहीं तापसी ( तप करणारे ) झाले आणि वनांत गेले. कांहीं रामाच्या भया निमित्त तेथेंच राहून नट ( सोंगें आणणारे ) नर्तक [ नाचणारे ] झाले.

**केचिद्वैतालिकाः शूराः राजानस्तद्भयार्दिताः ।**
**सगर्भा चंद्रसेनस्य भार्या दाल्भ्याश्रमंगता.**

काहीं शूर क्षेत्री रामाच्या भयानें दुःखित होत्साते वैतालिक. अथवा तालिक. ( टाळ्या वाजविणारे ) झाले. [ " वैतालिक " गागाभट्टी प्रकरण १ पान ४ पंक्ति ६. श्लोक.

**वैश्याद्धर्मेण शूद्रायां जातो वैतालिकाभिधः ।**
**चारणो सावयि भवेन्न्यूनो वृषल धर्मतः**

अर्थ. वैश्यापासून धर्मानें [ विवाह करून तीसीं संगत झाल्यानें ] शूद्रीच्या ठाईं होतो तो वैतालिक चारण त्याला ह्मणतात. तो अवयि होतो वृषल धर्म ( पुरुष ब्राम्हण क्षत्रिय वैश्य इति ३ आणि तत्समाचार. हीन संकीर्ण नव्हेत असे सर्व वर्ण सेवा. स्त्री सर्ववर्णगामिनी. ) याहून कमी होतो. अयमेव करणः (हाच करण) याचें कर्म. श्लोक.

**राज्ञाच ब्राम्हणानांच गुणवर्णन तत्परः ।**
**संगीत कामशास्त्रं च जीविका तस्य विश्रुता.**

अर्थ. राज्यांचे ब्राम्हणांचे गुण वर्णन करणें गायन करणें कामशास्त्रांत कुशल असून जीविका करावी. ( नठवा या नावानें प्रसिद्ध आहेत ) या जातीचा गुण घेतला ह्मणून वैतालिक अथवा वै हें अक्षर पादपूर्णार्थ घेतलें तर ( सोडून नाव केलें तर ) तालिक ह्मणजे टाळ्या करणारे झाले असा अर्थ निघतो. ) चंद्रसेनाची स्त्री गर्भासहीत दाल्भ्यां श्रमासं गेली.

**ततो राम समायातो दाल्भ्याश्रममनुत्तमं ।**
**पूजितो मुनिना रामोऽर्घ्य पाद्यासनादिभिः**

मग राम त्या अतिउत्तम दाल्भ्याश्रमास आला. त्या मुनीनें अर्घ्य पाद्य आसन आदि- करून राम पूजिला.

**अथ मध्यान्ह समये तस्मै भोजनमादरात् ।**
**ददौ दाल्भ्यो मुनिश्रेष्ठो भार्गवाय महात्मने.**

तेव्हां मध्यान्ह ( दोनप्रहर दिवस ) वेळीं आदरें करून त्या भार्गवास दाल्भ्य महामुनीनें भोजनास दिलें.

**भोजनावसरे तत्र गृहीत्वापोशनं करे रामस्तुयाचयामास हृदिस्थं स्व**

**मनोरथं । तस्मै प्रादादृषिः कामं भार्गवाय महात्मने याचयामास रामाद्वै कामं दाल्भ्यो महामुनिः । ततो द्वौ परमप्रीतौ भोजनं चक्रतुर्मुदा भोजनांते महाभागावासने उपविश्यच.**

तेथें भोजनाच्या वेळेस ओपोशन हातीं घेऊन आपल्या हृदयांत ( मनांत ) जो मनोरथ होता तें परशुराम मागूं लागला. महात्मा भार्गवराम यास इच्छिलें देऊ करून आपण ( दाल्भ्य ) रामापासून आपणास पाहिजे तें मागता झाला.

मग दोघेही मोठ्या प्रीतीनें हर्षयुक्त होऊन भोजन करिते झाले. भोजन झाल्यावर दोघेही महाभाग ( भाग्यवंत ) आसनावर बसून.

**तांबुलानंतरं दाल्भ्यः पपृच्छ भार्गवं प्रति ।**
**यत्त्वया प्रार्थितं देव तन्मे शंसितुमर्हसि.**

विडे घेतल्यानंतर दाल्भ्य भार्गवास विचारिता झाला कीं, तुझें मागीतलेलें सांगण्यास तूं योग्य आहेस.

**राम उवाच. तवाश्रमे महाभाग सगर्भा स्त्री समागता ।**
**चंद्रसेनस्य राजर्षेः क्षत्रियस्य महात्मनः**

राम ह्मणतो. महा भाग्यवंता तुझ्या आश्रमांत महात्मा चंद्रसेन राजर्षि क्षत्रियाची स्त्री गरोदर असलेली आली आहे.

**तन्मेतं प्रार्थितं देहि स्त्री सगर्भा महामुने ।**
**ततो दाल्भ्यः प्रत्युवाच ददामि तव वांछितं**

हे महामुने मी तुझ्यापासीं मागीतलें तें [ हें आहें ] सगर्भा स्त्री जी आहे ती मला दे. मग दाल्भ्य बोलला तुझें इच्छित मी देईन [ देतों ].

**यन्मया प्रार्थितं राम तन्मे दातुं त्वमर्हसि ।**
**ततः स्त्रियं समाहूय चंद्रसेनस्य वै मुनिः ॥**
**भिता सा चपलापांगी कंपमाना समागता.**

रामा मी जें तुजपासीं मागीतलें तें देण्यास तूं योग्य आहेस ।' मग मुनि ( दाल्भ्यानें ) चंद्रसेनाचे स्त्रिस बोलाऊन । ती भयपावलेली कांपत अपांगें ( डोळ्यांच्या पापण्यांजवळचे भाग ) चपल ( हालत आहेत ) असी येतीझाली तीस.

रामाय प्रददौ तत्र रामः प्रीतमना अभूत् ।
रामउवाच. यत्त्वया प्रार्थितं विप्र भोजनावसरे पुरा

रामाकारणे मुनि देता झाला [ तेव्हां ] राम प्रीतमना [ संतोष युक्तमन ] झाला. राम ह्मणतो. यत्त्वया प्रार्थितं [ जें तूं मागीतलेलें ] पूर्वी भोजनाच्या वेळेस तें.

तन्मे शंस महाभाग ददामितव वांछितं ।
दाल्भ्यउवाच प्रार्थितं यन्मयापूर्वं राम देव जगद्गुरो.

हे महाभाग्यवंता मला सांग तुझें इच्छित मी देतों. दाल्भ्य ह्मणाले हे जगद्गुरु रामा जें पूर्वी मी मागीतलें तें. (या)

स्त्रीगर्भस्थममुं बालं तन्मे दातुं त्वमर्हसि ।
ततो रामो ब्रवीद्वाक्यं यदर्थमिह मागतः

स्त्रियेच्या गर्भांत असलेलें बालक मला देण्यास तूं योग्य आहेस मग राम दाल्भ्यास ह्मणतात ज्या करितां मी येथें आलों.

क्षत्रियांत करश्चाहं तत्त्वंयाचितवानासि.

क्षत्रियांचा अंत करणारा तेंच तूं मागता झाला आहेस.

प्रार्थितं च त्वया विप्र कायस्थं गर्भमुत्तमं ।
तस्मात्कायस्थ इत्याख्यो भविष्यति शिशोः शुभं ॥

हे विप्रा शरीरांत असलेल्या उत्तम गर्भाला तुं मागीतल्यास म्हणून हें उत्तम बाळ यास कायस्थ असें नांव होईल.

जायमानो यदाबालो क्षात्रधर्मा भविष्यति ।
दुष्टाद्वै क्षात्रधर्मात्तु वारितुंच त्वमर्हसि.

हा उत्पन्न होणारा बाल जेव्हां क्षत्रिय धर्म चालविता होईल तेव्हां दुष्ट क्षत्रिय धर्मा-पासून वारण्यास तुं योग्य आहेस.

ततो दाल्भ्यः प्रत्युवाच भार्गवंप्रति हर्षितः ।
मा कुरुष्वात्र संदेहो दुर्बुद्धिर्न भविष्यति. ॥

मग दाल्भ्यमुनि हर्षयुक्त झालेले रामास बोलले हा संदेह तुं करूंनको हा दुर्बुद्धी होणार नाहीं.

एवं रामो महाबाहुर्हित्वा तं गर्भमुत्तमं ।
निर्जगामाश्रमात्तस्मात्क्षत्रियांत करः प्रभुः ॥

असा राम महाबाहु त्या उत्तम गर्भास सोडून क्षत्रियांचा अंत करणारांचा राजा त्या दाल्भ्यऋषीच्या आश्रमा पासून निघून जाता झाला.

ततः प्रकुपितो रामो नानावेश धरान्नृपान् ।
ज्ञात्वा नारद वाक्येन विशस्त्रानपिचावधीत् ॥

मग रागावलेला राम अनेक वेशधारण केलेले राजे यांस नारदाच्या सांगितल्यानें समजून जरीं शस्त्र रहीत होते तरीं त्यांस मारिता झाला. ( हा दुष्ट क्षत्रिय धर्म )

( हा कायस्थ पुढें कसा उत्पन्न झाला तें आणि याचें कर्म कसें झालें हें सांगितलें आहें हें कशावरुन असा संशय साहजीक ( कथाभागाचा संबंध मनांत आणिल्यानें ) होतो तो छेद होण्याकरितां येथें अधीक लिहिणे योग्य दिसतें.

शोध करितां करितां शके १४९० सालीं लिहिलेली प्रत द्राविडी लिपींत ग्रंथ दक्षिण हैदराबादेस एकां द्रविड ब्राह्मणाजवळ दिसली तीजवरुन प्रत करुन ( संस्कृत भाषा सर्वत्र एकच आहे यामुळें देवनगरी लिपींत ) घेतली ती ग्रंथकर्त्यापासीं आहे तीच्या सतेच्याळी ४७ व्या अध्यायांत श्लोक. द्विजा ऊचुः

चंद्रसेनस्य राजर्षेर्भार्या दाल्भ्या श्रमे स्थिता ।
वृत्तंच तत्र किं जातं कथयस्वाद्य भो गुह ४९
तस्याः कुक्षेः किमुत्पन्नं तस्य धर्मस्तु कीदृशः ।
तस्याधिकार कर्माणि वद सर्वाणि तान्यपि. ५०

अर्थ. चंद्रसेन राजर्षि याची भार्या दाल्भ्याश्रमास राहिली तेथें वृत्त ( घडलेली गोष्ट ) काय झालें तें गुहा ( स्कंदा ) आतां सांग. ४९

तीच्या पोटीं कन्या कीं पुत्र काय मुल झालें त्यांचा धर्म कसा त्याचे अधिकार आणि कर्में कसीं झालीं ती ही सांग. ५० असा प्रश्न श्रोते ऋषिजन सनत्कुमारादिक होते त्याहीं केला त्याचें उत्तर. )

स्कंद उवाच. कायस्थ एष उत्पन्नः क्षत्रिण्यां क्षत्रियात्ततः ।
रामाज्ञया स दाल्भ्येन क्षात्रधर्माद्वहिष्कृतः

क्षत्रिणीच्या पोटीं क्षत्रिया पासून हा कायस्थ उत्पन्न झाला ( विशेष अर्थ पहिले अध्यायांत चवऱ्याणव आर्ये पुढें पहा ) तो रामाच्या अज्ञेवरून दाल्भ्यानें क्षत्रधर्मा बाहेर केला. ( अध्याय १ आर्या ९९ हीचा अर्थ पेज ५९ आणि त्या आर्या पुऱ्या झाल्यावर रेणुका माहात्माचा ४७ वा अध्याय लिहिला आहे त्यांतील ४४ श्लोकाच्या खालीं लिहिलेली टीप पेज ८२ पहा).

**दत्त कायस्थ धर्मोस्मै चित्रगुप्तस्य यः स्मृतः ।**
**प्राप्त कायस्थ नामत्वाल्लेख्या वृत्तिश्च भूभृतां.**

चित्रगुप्त कायस्थांचे धर्म जे म्हटले आहेत ते त्यास दिले कायस्थ नावपावला म्हणून राजे लोकांपासीं लेखन करणें हें उपजीविकेचें साधन झालें.

**तस्य भार्या कृता चैत्रगुप्त कायस्थ वंशजा ।**
**तद्वंशजाश्च कायस्था दाल्भ्यगोत्रास्ततोभवन्.**

चित्रगुप्त कायस्थाच्या वंशजाची कन्या त्यास स्त्री केली त्याचे वंशज कायस्थ तेव्हां पासून दाल्भ्यगोत्री झाले.

**दाल्भ्योपदेशतस्तेवै धर्मिष्ठाः सत्य वादिनः ।**
**सदाचार रता नित्यं रताः हरि हरार्चने.**

दाल्भ्याच्या उपदेशानें ते धर्मिष्ट सत्यवादी सदाचार रत नित्य हरि हरार्चनांत रत असे झाले.

**देव विप्र पितृणां वै अतीथीनां च पूजकाः**
**यज्ञ दान तपः शीला व्रत तीर्थ रताः सदा.**

देव ब्राह्मण पितर आणि अतिथी यांची पूजा करणारे यज्ञ दान तप हीं त्यांचीं आचरणें झाली. व्रतें तीर्थ यात्रा करण्यांत सार्वकाल रत राहेत झाले.

## इति चांद्रसेनीय कायस्थोत्पत्तिः

असी चांद्रसेनीय कायस्थांची उत्पत्ती.

**अथ संकरजाः माहिष्य वनिता सुनु वैदहाद्यं प्रसूयते ।**
**स कायस्थ इति प्रोक्तस्तस्य कर्म विधीयते.**

आतां संकरज कायस्थ. माहिष्य स्त्रीचा पुत्र वैदेहा पासून जो प्रसवते तो कायस्थ असें म्हटलें आहे. त्याचें कर्म वर्णून सांगूं. [ हे कायस्थ कसे आहेत हें स्पष्ट समजणें अवश्य. आहे. गागाभट्टी म्हणजे गागाभट्ट कृत कायस्थ पद्धतिः हा ग्रंथ शके १७९४ यांत मुंबईत छापलेला प्रकरण. १ पत्र ११ पंक्ति १७ **माहि० वैदे० सका० तस्य० ]** अर्थ. माहिष्य वनिता [ गागाभट्टी प्रकरण १ पत्र ३ पंक्ति ८

**विप्रान्मुर्धावशिक्तासु क्षत्रियायां विशस्त्रियां ।**
**जातों ऽवष्टश्च शूद्रायां निषादः पार्श्वयोपिच.**

अर्थ विप्रा [ ब्राह्मणा ] पासून क्षत्रिणी स्त्रीच्या पोटीं होईल तो " मूर्धावषिक्त " वैश्य स्त्रीष्या पोटीं होईल तो " अंवष्ट " शूद्र स्त्रियच्या पोटीं होईल तो. " निषाद अ-थवा पार्श्वय. "

**माहिष्योग्रो प्रजायेते विद् शूद्रांगनयोर्नृपात् ।**
**शूद्रायां करणो वैश्यात् विन्नास्वेष विधीयते.**

अर्थ. क्षत्रिया पासून वैश्य स्त्रियेच्या पोटीं होईल तो " माहिष्य " शूद्र स्त्रियेच्या ठाई क्षत्रिय पुरुषापासून होईल तो " उग्र " वैश्य पुरुषा पासून शूद्र स्त्रियेच्या पोटीं होईल तो " करण " ह्या श्लोकांत " विन्नास्वेष " या शब्दांत " विन्नासु " म्हणजे लग्न केलेली-च्या ठाई आणि " एष " म्हणजे हा. असा अर्थ आहे. यांतला क्षत्रिय यास वैश्य स्त्रियेच्या ठाई झालेला " माहिष्य " आणि कन्या झाली ती " माहिष्या " हीच्या पोटीं वैदहा [ गागाभट्टी. : प्रक० १ पान ३ पंक्ति १०

**ब्राम्हण्यां क्षत्रियात्सूतो वैश्याद्वैदेहिकस्मृतः ।**
**शूद्राज्जातस्तु चांडालः सर्व धर्म बहिष्कृतः ॥**

अर्थ. ब्राम्हणीस्त्रीच्या पोटीं क्षत्रियापासून झाला तो " सूत " वैश्यापासून झाला तो " वैदेहिक " शूद्रापासून झाला तो " चांडाल " सर्वधर्मा बाहेर केलेला.

**क्षत्रिण्यां मागधं वैश्यात् शूद्रात्क्षत्तारमेवच ।**
**शूद्रादयोगवंवैश्यां जनयामास वै सुतं ॥**

अर्थ. क्षत्रिणीस्त्रीच्या पोटीं वैश्यापासून झालेल्यास " मागध " शूद्रापासून झालेल्यास " क्षत्तार " वैश्यस्त्रीच्या पोटीं शूद्रापासून झालेल्यास " अयोगवी " असें म्हणावें. ह्या

प्रतिलोमाच्या मातापितरांचें लग्न असें पद कोठेंच नाहीं यामुळें लग्नावाचून असा अर्थ होतो. ह्यांतला ब्राम्हणीला वैश्यापासून झालेला वैदेह ) यापासून जो मूल झाला तो " का-यस्थ " ह्याचें कर्मसांगू असा अर्थ होतो ह्यांत भिन्नजाती दोन मिळून संतती ( उत्पत्ती ) झाली असल्यामुळें " संकरज " असें नांव झालें आहें. )

लीपीनां देशजातानां लेखनंच समाचरेत् ।
गणकत्वं विचित्रत्वं बीजपाटी प्रभेदतः ॥

देशादेशांत झालेल्या लीपींचें लेखन करणें हिशोब ठेवणें चित्रविचित्रपणा अनेक प्रकारचीं बीजें लावणें.

वृत्या तया वर्तनं स्यात्कायस्थस्य विशेषतः ।
अधमो वैश्य जातिभ्यः पंच संस्कारवानसौ ॥

त्याच्या वृत्तीनें असें वर्तन आहें. विशेषेंकरून कायस्थाचेंच असा वैश्य जातीहून कमी पांच संस्कार करणारा [ ह्यांत गागाभट्टी प्रकरण १ पत्र ११ पंक्ति १८ आणि शूद्र कमलाकर पत्र ७८ पंक्ति ११ यांत पाठ

" अधमो शूद्र जातिभ्यः पंच संस्कारवानसौ " ॥

अर्थ शूद्रजातींहून कमी हा पंचसंस्कार वान् [ करणारा ] शूद्रास संस्कार १० शूद्र कमलाकर पत्र ११ पंक्ति १७ श्लोक

नवैताः कर्णवेधांता मंत्रवर्जं क्रिया स्त्रियाः ।
विवाहो मंत्रतस्तस्याः शूद्रः स्यामंत्रतो दश ॥

कर्णवेधा पावेतों हे नव ९ वेदोक्त मंत्र रहित या पुढें स्त्रियांचा विवाह वेदोक्त मं-त्रानें आणि शूद्रांचा मंत्र रहित मिळून दहा ( ह्यांत ९ कोणते शूद्र कमलाकर " गर्भाधान " १ पान २१ पंक्ति १ " पुंसवन " २ पान २१ पंक्ति ६ " सीमंतोन्नयन " ३ पान २१ पंक्ति १० " जातकर्म " ४ पान २१ पंक्ति १९ " नामकर्म " ५ पान २२ पंक्ति १४ " निष्क्रमण " ६ पान २३ पंक्ति ७ " अन्नप्राशन " ७ पान २३ पंक्ति २१ " चौल " ८ पान २५ पंक्ति १२ " विद्यारंभ " ९ पान २५ पंक्ति १७ " विवाह " १० पान २६ पंक्ति ६ मिळून दहा ] कायस्थों ( संकरजांस ) पांच ५ संस्कार [ गागाभट्टी प्रकरण १ पत्र १३ पंक्ति ६ " जातकर्म " १ " नामकर्म " २ " अन्नप्राशन " ३ " कर्णवेध " ४ विवाह ५ असे मिळून ५ ]

अयं संकर जातीयः हे संकर जातीचे.

इति त्रिविधा कायस्थाः असे तीन प्रकारचे कायस्थ.

तत्र कायस्थ एष उत्पन्नः क्षत्रिण्यां क्षत्रियात्ततः इति चंद्रसेनज कायस्थस्य तु चंद्रसेन क्षत्रियाद्विवाहितायां क्षत्रिण्यां तद्भार्यायामुत्पन्नत्वेन शुद्ध क्षत्रियत्वात् श्रौत स्मार्त कर्मण्यधिकारोस्त्येव नच. "रामाज्ञया स दाल्भ्येन क्षात्रधर्माद्वहिष्कृतः" इति वचनविरोधः तत्र क्षात्रधर्म शब्दः शौर्यादि क्षत्रियाः साधारण धर्मपरः नतु श्रौत स्मार्त यावद्धर्मपरः तथात्वे देवार्चनादि धर्माणामपि निषेधापत्तेः किंच "तवाश्रमे महाभाग" इत्याद्युपक्रम्य कायस्थोत्पत्तिमुक्त्वा "दाल्भ्योपदेशतस्तेवै" इत्यादि "यज्ञदान तपः शीला व्रत तीर्थ रताः सदा" इत्युपसंहृते उपक्रमोप संहाराभ्यामपि चांद्रसेनीय कायस्थानां शुद्ध क्षत्रियत्वं प्रतीयते.

त्यांत मग क्षत्रिणीच्या पोटीं क्षत्रियापासून हा कायस्थ उत्पन्न झाला. असें चंद्रसेनापासून उत्पन्न झालेले कायस्थांचें चंद्रसेनक्षत्रियापासून त्याणें विवाहिलेली क्षत्रिणी त्याचीभार्या हीच्या पोटीं उत्पन्न झाल्यामुळें शुद्ध क्षत्रियपणा पासून श्रौत स्मार्त [ अग्निहोत्र ] कर्माविषयीं अधिकार आहे असे [ याज्ञवल्क्य स्मृति आचाराध्याय श्लोक ९०

सवर्णेभ्यः सवर्णासु जायंतेहि सजातयः अनिंद्येषु विवाहेषु पुत्राः संतान वर्धनाः अर्थ सवर्ण पुरुषापासून ब्राम्हादि विवाह ज्या वर्णास जो उक्त तो अनिंद्य अशा विवाहानें विवाहिलेल्या सवर्णा स्त्रीच्या पोटीं होतात ते सजातिय पुत्र वंशवृद्धीस योग्य ) यास "रामाच्या आज्ञेनें तो दाल्भ्यानें क्षत्रधर्मा बाहेर केला" या वचनानें विरोध येत नाहीं. येथें क्षात्रधर्म शब्द जो तो शौर्यादिक [शूरत्व आर्यपण ] क्षत्रियांचे साधारण धर्म या अर्थाचा आहे, श्रौत स्मार्तादि सर्वधर्म अशा अर्थाचा नाहीं. तसाच देवार्चनादि धर्माचा निषेधही प्राप्त आहे किं काय यावर "हे महाभाग्यवंता तुझ्या आश्रमांत" असे आरंभा पासून कायस्थ उत्पत्ती सांगितली तींत "दाल्भ्याच्या उपदेशापासून ते" अशा वाक्यास आधि घेऊन "यज्ञ दान तप हेंच आहे ज्यांचें आचरण असे व्रत आणी तीर्थ यांत सर्वकाल रत" अशा पर्यंत सर्व आरंभापासून शेवटापर्यंतानीही चांद्रसेनीय कायस्थांचें शुद्ध क्षत्रियपण प्रतीतीस येतें ( निश्चय होतो. )

उपक्रमोपसंहारावभ्यासो पूर्वतां फलं । अर्थवादोपपत्तिश्च लिंग तात्पर्य निर्णये ॥

अर्थसंबंधी वाद लिंगतात्पर्याच्या निर्णयांत उपपत्ती ( अर्थसिद्धीसंबंधीवाद ) आरंभा पासून शेवटा पावेतों मनन पूर्वक होईल तें फल.

**इत्याभियुक्तः तस्माच्चांद्रसेनीय कायस्थानां शुद्ध क्षत्रियत्वेन द्विजत्वात् श्रौत स्मार्तेज्याध्ययन दान रूपेसु कर्मसु अधिकारोस्तीति सिद्धं.**

हें असें यथायोग्य त्यावरून चांद्रसेनीय कायस्थांचा शुद्ध क्षत्रियत्वानें द्विजपणा आहे त्यानिमित्त श्रौत स्मार्त यजन आध्ययन दान या कर्माविषयीं अधिकार आहे असें सिद्ध आहें.

**ईज्याध्ययन दानानि विहितानि द्विजन्मनां । प्रतिग्रहाध्यापनं च ब्राह्मणस्यैव याजनं.** अर्थ यजन आध्ययन दान हीं ३ कर्मे दोनजन्म ( एक आईच्या उदरातून उपजणें दुसरें वेदकर्म करण्यास अधिकारी होण्या करितां तीनही वेदाचें सार ॐकार व्याहृती सहीत गायत्री उपदेश घेणें हे ) ज्यांस आहेत त्यांचीं योग्य आहेत. दानघेणें आध्यापन [ आध्ययन करविणें ] करणे याजन हीं तीन ब्राह्मणांचींच [ या० स्मृ० आ० श्लो० ११८ ]

**इति प्रामाण्यायदाह याज्ञवल्क्यः ब्रह्म क्षत्रिय विद् शूद्रा वर्णास्त्वाद्य त्रयो द्विजाः निषेकाद्यान्स्मशानांता तेषां वै मंत्रतः क्रियः**

या प्रमाणा निमित्त जें याज्ञवल्क्य ह्मणतात. तें ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शुद्र असे वर्ण यांत पहिले तीन द्विज आहेत. त्यांच्या अभिषेका पासून श्मशाना पर्यंत ज्या क्रिया त्या मंत्रें करून व्हावयाच्या ( आचा० श्लोक १० )

**इति याज्ञवल्क्य वचनाद्दाल्भ्य गोत्राणां चांद्रसेनीय प्रभूपाव्हय कायस्थानां गर्भाधानाद्याः संस्काराः समंत्रकाः भवंतीति सिद्धं तस्मादेव नानाविध पर्यायालोचनया युष्मत्सदाचार परंपरया त्रये गर्भाधानाद्याः संस्काराः समंत्रकाः भवंति तत् शास्त्रसंमतं निर्बाधमेव. किंच युष्मत्प्रतिपाक्षि वेदशास्त्र निपुण नीलकंठ प्रभृति मतानुकूल धर्मशास्त्रीय वचनस्यालाभात्केवलं स्वीय कल्पनया मत्सराभिनिवेशेनोक्तस्य सिद्धांतात्रोचितत्वात्युष्मत्ज्ञातीयानां यजनाध्ययन दानात्मक कर्म त्रयात्रिधिकारः कालत्रयाबाध्यः इति सिद्धांतः**

अशा याज्ञवल्याच्या वचनास्तव दाल्भ्य गोत्राचे चांद्रसेनीय प्रभु उपनामक कायस्थ यांचे गर्भाधानादि करून संस्कार वेद मंत्रानें होतील असें सिद्ध आहें. तस्मात् म्हणजे त्याहून असे नानाप्रकारचे निबंध आणि पर्याय पाहिल्यानें आणि तुमची सदाचार परंपरा जी तीणें तीन कर्मे आणि गर्भाधान आदिकरून संस्कार समंत्रक ( वेद मंत्रानी ) होतील तें शास्त्रांस मान्य आणि त्यांस बाध नाहीं असें आहें. कां तर तुमचे प्रतिपक्षी नीलकंठ मुख्य

यांच्या मतास अनकूल अशीं शास्त्रवचनें नाहींत. यामुळें केवळ स्वकल्पनेनें मत्सर ( वाईट पाहणें ) यांत शिरून जें बोलणें तें सिद्धांतास उचित [ योग्य ] नाहीं यास्तव तुमचे जाती-यांचे यजन आध्ययन दानासहीत तीन कर्माचे अधिकार कालत्रय [ भूत वर्तमान भविष्य ] यांत बाध रहित आहेत असा सिद्धांत आहे. ( तीन कर्मांचा विशेष अर्थ या ग्रंथाच्या पहिल्या अध्यायाच्या १०२ आर्येच्या अर्थांत पृष्ट ११ पासून ७९ यांवर पहा. ]

**श्री शंकराचार्यांचीं तैलंगी लीपींत अक्षरें आहेत यांत श्री नृसिंहभारती स्वामी यांनी आपलें नामादिक लिहिलें आहे.**

[ वर पृष्ट १४४ आणि १६० याजवर चित्रगुप्त कायस्थोत्पत्ती सांगीतली आहे तींत चित्रगुप्तांचा विस्तार सांगीतला नाहीं तो गागाभट्ट कृत कायस्थ धर्म दीप १ प्रदीप २ आणि कमलाकर कृत शूद्र कमलाकर ३ यावरून.

कायस्थ धर्मदीप शके १७९४ यांत छापिलेला. प्रकरण १ पत्र १० पंक्ति १० पासून आणि कायस्थ धर्म प्रदीप टकले गुरुजी यांजकडे सापडला त्याची प्रत अमृतराव आबाजीनें केली आहे तीचें पत्र १ पंक्ति २ पासून आणि शूद्र कमलाकर त्र्यंबक उर्फ रावजी श्रीधर गोंधळेकरानी शके १८०९ सालीं जगद्धितेच्छु छापखान्यांत छापिला आहे त्याचें पत्र ७७ पंक्ति १८ पासून. संहिता व अर्थ.

**सृष्ट्यादौ सदसत्कर्म ज्ञप्तये प्राणिनां विधिः ॥**
**क्षणं ध्याने स्थितस्तस्य शरीरान्निर्गतो बहिः**

अर्थ. सृष्टी उत्पन्न करण्या पूर्वी प्राणि जनांचे बरें वाईट कर्म समजण्या करितां ब्रह्मा क्षणभर ध्यानस्थ बसले तों त्यांच्या शरीरापासून बाहेर निघाला.

**दिव्यरूप पुमान्हस्ते मषीपात्रं च लेखनीं ।**
**दधानश्चित्र रूपेण रक्षितो देवतैर्हृदि**

अर्थ. दिव्यरूप पुरुष हातांत दऊत लेखनी विचित्र रूप धारण केलें यामुळें देवानी हृदयांत ठेविला.

**चित्रगुप्त इति ख्यातो धर्मराज समीपतः ।**
**ब्रम्हणा सहितैर्देवैः क्षणंध्यात्वा नियोजितः**

अर्थ. चित्रगुत नांव ज्याचें असा धर्मराजासमीप ब्रम्हदेवा सहींत देवांहीं क्षणभर विचार करून योजिला.

प्राणिनां सदसत्कर्म लेखनाय स बुद्धिमान् ।
भोजनादौ बलिस्तस्य भागोंपि परिकल्पितः

अर्थ. भोजनाचे आधीं बलिभाग कल्पित करून प्राण्यांचें बरें वाईट कर्म लिहिण्या करितां यमास दिला.

ब्रह्मकायोद्भवो यस्मात्कायस्थ इति गीयते ।
दक्षःप्रजापतेः कन्यादाक्षायण्या भिधांतनः

अर्थ ब्राम्ह देवाच्या देहापासून झाल्यामुळें कायस्थ ह्मणतात. मग दक्ष प्रजापती ची कन्या दाक्षायणी नावाची हीला.

उपयेमेततः पुत्रो जातस्तस्य महात्मनः ।
विचित्रगुप्त नामाऽसौ बुद्धि चातुर्य वीर्यवान् ॥

अर्थ. वरिली त्यावर त्या महात्म्याला पुत्र झाला विचित्रगुत नावाचा हा बुद्धि चातुर्य आणि वीर्य [ शक्ति ] वान्.

ततस्तेन मनोः कन्या यथाविधि विवाहिता ।
स्वक्षाभिधानतस्तस्यां धर्मगुप्तो बभूवह ॥

मग त्याणें मनूची कन्या यथाविधि विवाहिली ( लग्न केलें ) ती स्वक्षानावाची तीच्या पोटीं धर्मगुन झाला.

धर्मगुप्ताच गाधार्यां रुद्रगुप्तोऽभवत्सुतः ।
तस्मादप्सरसो जातं पुत्राणांच चतुष्टयं:

अर्थ. धर्मगुप्ता पासून गांधारीच्या पोटीं पुत्र रुद्रगुत झाला त्यापासून, अप्सरेच्या पोटीं च्यार पुत्र झाले.

माथुरो गौड संज्ञश्च नागरो नैगमस्तथा । तेषां नामानि चत्वारि चतुर्णां च यथाक्रमं ॥ ते माथुर १ गौड २ नागर ३ नैगम ४ यांचीं नावें च्यार अनुक्रमानें चौघांची.

**कायस्थश्चैव शाकश्च कौलिकश्च महेश्वरः । नाना गोत्राश्च तद्वंश्याः कायस्था भुवि संति वै ॥** कायस्थ १ शाक २ कौलिक ३ महेश्वर ४ असीं हीं होतीं झालीं त्यांचे वंशज अनेक गोत्रांचे कायस्थ भूमीवर आहेत.

**ये तेषां काश्यपं गोत्रं तेषां धर्ममथ शृणु । स्नानं द्विकालमेतेषां त्रिकालं संधि वंदनः ॥** जे त्यांचें गोत्र काश्यप [ विचित्रगुप्त नावाचा जो त्यास कश्यप ऋषीनें उपदेशिल्यामुळें ] त्यांचे धर्म ऐका. दोन वेळ ( प्रातः सायं ) स्नान, तीनकाल [ प्रातः मध्य सायं ] संध्या करणें.

**अष्टम्यां च चतुर्दश्यां चंडीव्रत परायणाः । भौमवार व्रताश्चैव नवरात्र व्रतास्तथा ॥** अष्टमी ( इतर सर्व आहेत परंतु अत्यावश्य श्रावण. मारवाडी भाद्रपद वद्य ) चतुर्दशी ( अत्यावश्य अश्वीन आणि माघ वद्य ) तिथींस चंडी [ महालक्ष्मी शक्ती ] चें व्रत तसींच नवरात्र मंगळवार हीं व्रतें करण्यांत तत्पर. **तर्पणं पंचयज्ञानां विधानं च यथाक्रमं ।** तर्पण पंच महायज्ञ [ ब्रह्मयज्ञ १ देवयज्ञ २ भूतयज्ञ ३ पितृयज्ञ ४ मनुष्ययज्ञ ह्मणजे अतिथी भोजन ५ ] हे यथाविधि ( वेद शास्त्रांत सांगीतल्या रीतीनें ) करावेत.

**गागाभट्ट कृत कायस्थ धर्म दीप** प्रकरण १ पत्र १७ पंक्ति १ **चंद्रसेन भार्योत्पन्नोयः** स दाल्भ्य मुनिना चित्रगुप्त वंशस्थ कन्यया विवाहितस्तस्मै चित्रगुप्त धर्मो लेखन-वृत्यादिरपि दत्तस्तस्मात्तदुत्पन्नाये **चांद्रसेनीय कायस्थास्ते चित्रगुप्त समान धर्माणो भवंति.** चंद्रसेनाच्या स्त्रियेच्या पोटीं झालेल्या [ सोम राज्याला ] दाल्भ्यमुनीनें चित्रगुप्त वंशजाची कन्या विवाहिली त्याकारणें चित्रगुप्तधर्म लेखनवृत्ती आदिकरून दिले. त्यापासून उत्पन्न झालेले जे चांद्रसेनिय कायस्थ ते चित्रगुप्तासमान धर्माचे होतील.

**संबंध तत्वे.** संबंध तत्व ग्रंथांत

**नानाविधास्तुकायस्थाः ब्रम्ह कायोद्भवादयः ।**
**चित्रगुप्ताश्चांद्रसेनास्तेषांधर्म समो भवेत् ॥**

अनेक प्रकारचे कायस्थ ब्रम्हकायापासून झालेले चित्रगुप्त आदिकरून आणि चांद्रसेनीय यांचा धर्म सारखा होयील. इति त्रिष्वपि वचनात्. याप्रमाणें तीनही वचनांच्या आधारें ( समान धर्म झाले आहेत. )

हे चित्रगुप्त कायस्थ षट्कर्में करीत आहेत. वेद आणि स्मृति यांच्या अर्थाप्रमाणें

पाहतां या ग्रंथांत पृष्ठ ६२ आर्या २ पुढें पृ० ७९ पावेतों आणि पृ० ९९ पासून पृ० १०० आणि पृ० ११९ पा० १३३ पावेतों उपपत्ती पहा. यावरून माझे मतें शके १७९३ सालीं सातारकर चिटनवीस यांनीं आपले जातीयांस वेद शास्त्रज्ञ करून त्यांपासून सर्वकर्में चालविलीं तसीं चालवावीं हें चांगलें. **सद्दाकर्में आपण करूं नयेत असी समजूत अगदीं चुकीची आहे.** आम्हाकडे वेदोक्त कर्म करूंनये असा त्याहीं कट केला असें समजा. उदाहरण, कैलासवासी वेदशास्त्रसंपन्न भाऊगुरुजी टकले ज्यांणी कोकणांत आणि वराडादिक देशांत विद्याबळानें विद्वानांची खातरीकरून आम्हां लोकांकडे वेदोक्त कर्में चालविलीं, त्यामुळें आम्हीं शेकडो रुपयांनी त्यांची पादपूजा केली. त्यांचा मुलगा पेणकर देशस्थांहीं फितऊन त्याणी आमचें गुरुत्व सोडिलें आणि कोंकणस्थांत मिळाला, असाप्रकार कधीं तरीं घडला. आतां वेदोक्त कर्म प्रवृत्ति कसी राहवी ! उत्तर धर्म बुडाला असें समजून कर्म सोडून धावें, किंवा निःशंक आपण चालवावें. चित्रगुप्त आणि चांद्रसेनीय समानधर्मा हें गागाभट्टांहीं ठरविलेंच आहें. गुण कर्म विभागांनीं युक्त असून निष्प्रतारण कर्म करील त्या अन्य इतरांवर अवलंबून न राहतां आपणच चालवावें हें योग्य, अधर्म रत राहणें योग्य नव्हे. ईश्वर वाक्य महा भारत भ० गी० अ० ३ **न कर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते । नच सन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति** **अर्थ** कर्में केलीं नाहीं तर नैष्कर्म्यत्व प्राप्त होत नाहीं कर्में टाकिलीं तर योग्य सिद्धी ( मोक्षास ) जाणार नाहीं. ४

**नहि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् । कार्यते ह्यवशः कर्म सर्व प्रकृतिजैर्गुणैः** ५ अर्थ उत्पन्न झालेला कोणीही एक क्षणभरही कर्मरहित रहात नाहीं, प्रकृति पासून सर्वगुण झाले आहेत त्या गुणांसह कर्म अवश्य केलें पाहिजे. ५

**नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायोह्यकर्मणः । शरीरयात्रा पिच ते न प्रसिद्धेदकर्मणः** ८ तूं ( अर्जुना ) नियमित कर्म कर कर्म करून अकर्ता असा कर्मकेल्याविना होतनाहीं, कर्मकेलेंचनाहीं तर तुझी शरीरयात्रा ( देहाचें सार्थक ) सिद्धिस जाणार नाहीं.

ह्या वरून कर्म केलेंच पाहिजे तें करणें आणि करविणें ह्मणजे सद्दा. ही कर्में केलींच पाहिजेत कारण एकाचा संबंध दुसऱ्यासीं असे तीनचार पांचसहाचे संबंध आहेत ह्याकरितां चांद्रसेनीयांनीं शाळास्थापून वेदशास्त्राभ्यास अवश्य केलापाहिजे हीकडे समर्थ ज्ञाते आदिसर्वांनीं लक्ष दिलें पाहिजे. ह्याकरितां भगवद्गीतेचे अध्याय ३ ४ ५ ६ ७ ८ ९ १२ १३ १४ तरी पाहिले म्हणजे दृढ निश्चय होतो—आणि कर्मकेलें नकेलें तर त्यांचीं फळें

**महाभारत शांतिपर्व अध्याय १८८ मोक्षधर्म** भारद्वाज ऋषीच्या प्रश्नानें भृगु महर्षीतले मुख्य हे उत्तर देतात.

**न विशेषोस्ति वर्णानां सर्वं ब्राम्हमिदं जगत्। ब्रह्मणा पूर्व सृष्टंहि कर्मभिर्वर्णतां गतं ॥ १० ॥** अर्थ. वर्णांत कांहीं विशेषत्व नाहीं सर्व जगत् एकब्राह्म आहे ब्रम्हदेवानें एकच रचिलें तें कर्में जीं तीहींकरून वर्णतेस गेलें १० पूर्वी सर्व ब्राह्मणच उत्पन्न केलें. पुढें.

**काम भोग प्रियास्तीक्ष्णा क्रोधनाप्रिय साहसा। त्यक्त स्वधर्मा रक्तांगास्ते द्विजाः क्षत्रतां गताः ॥ ११ ॥** अर्थ. ब्राम्हणपणाचे गुण तो स्वधर्म न आचरून मनांस आले ते भोग प्रियमानून तीव्रत्वानें रागीट आणि न करणें तें करून रक्तवर्ण [ रजोगुण मय ) जे झाले ते ब्राह्मण क्षत्रियत्वास पावले. ११

**गोभ्यो वृत्तिं समास्थाय पीता कृष्युपजीविनः। स्व धर्मान्नानुतिष्ठंति ते द्विजाः वैश्यतां गताः ॥ १२ ॥** अर्थ. गांई बाळगून सेतीवर उपजीविका करून स्वतःचा ब्राम्हण धर्म टाकून पीवळे ( रज आणि तम मिश्र ) झाले ते ब्राम्हण वैश्यतेस पावले. १२

**हिंसानृतप्रिया लुब्धा सर्वकर्मोपजीविनः। कृष्णा शौच परिभ्रष्टास्तेद्विजाः शूद्रतां गताः ॥ १३ ॥** जीवहत्येला न भीतां खोटें कर्म प्रिय लोभी हवें तें कर्म करून उपजीविका आणि कृष्ण ( केवळ तम ) धारणा असे आचारभ्रष्ट झाले ते ब्राम्हण शूद्रत्वास पावले. १३

**इत्येतैः कर्म भिर्व्यस्ता द्विजा वर्णांतरं गताः। धर्मो यज्ञक्रिया तेषां नित्यं नप्रतिषिध्यते ॥ १४ ॥** इतके तीन प्रकारचे स्व ( ब्रह्म ) कर्मासह न राहिले म्हणून वर्णतेला पावले कारण धर्म आणि यज्ञक्रिया नित्यकर्णे त्या झाल्या नाहींत यामुळें निषेधित झाले. १४

**इत्येते चतुरो वर्णा येषां ब्राम्हीसरस्वती। विहिता ब्रम्हणा पूर्वं लोभात्त्वज्ञानतां गताः ॥ १५ ॥** ब्रह्मदेवानें चारही वर्णास ब्रम्हगायत्री योग्य ( सारखी ) ठेविली होती ( परंतु ) लोभानें अज्ञानत्वास पावले. १५

• याकरितांच याज्ञवल्क्यानें आचाराध्यायांत श्लोक ९५।९६ घातले आहेत. पुढें ४९

आर्ये खालीं त्यांचा अर्थ पहा. **अध्याय १८९** ब्राम्हण क्षत्रि आदिकरून कशानें होईल तें सांग असा भरद्वाजानें प्रश्न केल्याचें उत्तर भृगुऋषी देतात.

**जातकर्मादिभिर्यस्तु संस्कारैः संस्कृतः शुचिः । वेदाध्ययन संपन्न षट्सु कर्मस्ववस्थितः ॥ २ ॥** अर्थ. जातकर्मादिक ४८ अष्ट चत्वारिंशत ( नीलकंठ यांही लिहिलें आहे ) हे संस्कार होतील. प्रतिदिवशीं षट्कर्मे ( पृष्ट ९७ पहा ) जो करील तो ब्राम्हण तो सायुज्य मुक्तीस जाईल. २

**शौचाचार स्थितः सम्यग्विघसासी गुरुप्रियः । नित्य व्रती सत्यपरः सैव ब्राम्हण उच्यते ॥ ३ ॥** अर्थ. प्रातःस्मरण मलमुत्रादिक शोच ( शुद्ध होणें धर्मसिंधू पाहिल्यानें समजतें ) यांत " सम्यग् " ( बरोबर करणे ) रत. " विघसासी " [ देव ब्राम्हणादि अतिथीस भोजन घालून शेष राहिलेलें खाणारा ] गुरूस प्रिय. नित्य खरेपणाची वृत्ती. असा जो तोच ब्राह्मण ह्मणतात. ३

**सत्य ज्ञानमथा द्रोहो अनृशंस्यं त्रपा घृणा । तपश्च दृश्यते यत्र स ब्राम्हण इति स्मृतः ॥ ४ ॥** अर्थ. खरेपण १, ज्ञान २, अद्रोह, ३, अनृशंस्य ४, त्रपा ५, घृणा ६, तप ७ हीं जेथें दिसतील तो ब्राम्हण असें म्हटलें आहे. ४।५।६।७ हे अनुक्रमें क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांचीं लक्षणें सांगीतलेले आहेत. त्यांत क्षत्रिय, वैश्य, वेदाध्ययनी आणि वेदरहित तो शूद्र.

**शूद्रेचैतद्भवेल्लक्ष्यं द्विजे तच्च न विद्यते । नैव शूद्रो भवेच्छूद्रो ब्राम्हणो नच ब्राह्मणः ॥ ८ ॥** अर्थ शूद्रांत हीं लक्षणें असतील आणि ब्राम्हणांत नसतील तर तो शूद्र शूद्र नव्हे आणि तो ब्राम्हण ब्राम्हण नव्हे. याचें स्पष्टीकरण तो शूद्र ब्राम्हण आणि तो ब्राह्मण शूद्र. ह्यांत भारतावर टीका कर्ते नीलकंठ चौधरी यांचे टीकेवरून प्राकृत अर्थ लिहिला आहे.

**महदाधार श्रुति शास्त्रांचा घेऊनियां सुवाक् समरीं ।**
**श्रुतिशास्त्रज्ञ मतें जयघे जो सदसीं सुरोर्भकीं कमरीं. ३४**

वेद आणि शास्त्रें यांचा मोठा आधार घेऊन मोठ्या शद्ब युद्धांत जे वेद शास्त्र जाणते. त्यांच्या मतानें मोठे अडविणारे ब्राम्हण कमर ( कु. पृथ्वी. भूः भूमि. अमर देव ह्मणजे भूदेव ) यांत सभेमध्यें जय घेतला. ३४

**त्या आचार्याचा सद्वंश वसतसे अनेक नगरांत ।**
**त्यांत श्री सिद्धेश्वर नाम ग्रामीं वसे द्विष गरांत ३९**

त्या आचार्याचा ( कुलगुरुचा ) वंश अनेक नगरांत राहात आहे त्यांत श्री सिद्धेश्वर नावाचा [ सुधागड म्हणजे पंत सचीवांचा किल्ला भोरप त्या तालुक्यांत अलोणें तर्फेंत ] गांव आहें त्या गावांत लोक आहेत. ते आपण "चित्पावन" आहों असे समजतात त्यांत ( खरोखर ) "चित्पावन" म्हणजे या ग्रंथांत वरतीं याच अध्यायांत पृष्ठ १२९ यावर साहावे आर्ये पुढें स्कंदपुराण सह्याद्री खंड उत्तर रहस्याचा पहिला अध्याय घेतला आहे त्याच्या ३३ व्या श्लोकापासून ४० श्लोकपर्यंत पृष्ठ १२९।१३० पहा तेच आहेत किंवा ३२ साव्या श्लोकापुढें हेमाद्रि प्रबंधाच्या १८ अध्यायाचे कांहीं श्लोकांचा अर्थ लिहिला आहे पृष्ठ १२७।१२८ पहा त्यांतील "चित्त पावन" यांचीं गोत्रें उपनामें हेमाद्रि प्रबंधाच्या २० व्या अध्यायांत सांगितलीं आहेत (हीं "चित्त पावनांचीं" गोत्रें आणि उपनामें भार्गवानीं "चित्पावनांस" दिलीं आहेत) ते "चित्त पावन" आहेत हें न जाणो. ह्याची बोळख त्यांच्या परंपरेच्या आचरणावरून करणे आहे. परंतु सांप्रत पेशवे मुख्य झाल्यापासून "चित्त पावन" काश्यपेय भार्गवादिक जे प्राचीन आहेत त्यांत आपला समावेश करून घेण्यापेक्षां "चित्पावनां" अर्वाचिनां परशुराम कृतांत समावेश करून घेणें हें थोरपणास चांगलें समजून "चित्पावनच" आम्ही असें समजतात ते आहेत न जाणो ] त्यांत द्वैपक्षप विप्रांत शंकरसा राहात आहे. भार्गव [ परशूराम ] याच्या चित्तास पावन करणारे यांचीं गोत्रें १२ हेमाद्रि प्रबंध अध्याय १८ "चित्त पावन प्रसंग" त्यांत १२ व्या श्लोक. **कपिं २ तथा कौशिकम् २ अत्रि ३ कश्यपौ ४ कौंडिन्य ५ नैतुंदन ६ जामदग्निन् ७ शांशिल्य ८ वासिष्ठक ९ विष्णुवर्धनान् १० वत्सम् ११ भरद्वाज १२ मुवाचगर्गः** हीं आणि गर्ग मिळून १३ आणि स्वतः भार्गव असीं १४ हीं हेमाद्रि प्रबंधाच्या २० अध्यायांत सांगीतली श्लोक

**भरद्वाज १ शांडिल्य २ वासिष्ठ ३ वत्सा ४ स्तथा गार्ग्य ५ कौंडिन्य ६ नैतुंदन ७ अत्रिः ८ । कपिः ९ कौशिकः १० कश्यपो ११ जामदग्नि १२ स्तथा भार्गवो १३ वर्धनोविष्णुपूर्वः १४**

वर्धन शब्दाला पूर्वी विष्णु असें नांव म्हणजे "विष्णुवर्धन" असीं चवदा गोत्रें आणि चित्त पावनांची उपनामें २०८ आहेत त्याच ( हे० प्र० अ० २० ) अध्यायाचा श्लोक ४१ **अष्टाधिक द्विशत नाम गणस्तु तत्र संमीलितश्च शुचये किल भार्गवस्य ।**
**दृष्ट्वा महर्षिमतुलं समवाप्य रामो मंत्र चकार गुरुणासह भार्गवश्च ॥**

अर्थ भार्गवाच्या चित्त शुद्धी करितां आठ अधिक दोनशत नांवाचा गण [ समूह ] तेथें मिळाला त्या अतुल महर्षीला पाहून भार्गवराम गुरु [ गर्ग ] सह संमत ( चित्तशुद्धी प्रायश्चित्ताचा बेत ) करिता झाला ह्या २०८ पैकीच ६० नांवें चित्पावनांस दिलीं आहेत. ३५

**टकलोपाव्हक लक्ष्मण आचार्यस्तद्गृहीं निधी गमला ।**
**केला संग्रह प्रभुकुल मंडन नवदोत ते कुधीग मला ३६**

टकले उपनामक "चित्त पावन" [ ह्या अध्यायांतच चवदाव्या १४ आर्येच्या अर्थांत पहा ] लक्ष्मणाचार्य त्यांच्या घरीं निधी [ हा श्रीशंकराचार्य आणि काशीस असलेले एतद्देशीय पंडित यांनी निश्चय केलेला धर्म कर्म अधिकार रूप अमूल्य रत्नाचा ठेवा ] दिसला त्याचा संग्रह ( लक्षपूर्वक घेणें ठेवणें ) मी ग्रंथकर्त्यानें [ स्वज्ञातीय शिष्टांच्या माहिती करितां ] केला आहे. प्रभुकुलांत श्रेष्ठ जे आहेत ते मला ( ग्रंथकर्त्याला ) हा वाईट बुद्धीनें चालणारा असें न ह्मणोत. ३६

**या दोन शास्त्रसिद्धांता जो पाहूं स्पृहा धरील मनीं ।**
**त्या प्रभुनें तें जाउनि व्हावें रत तत्पदाब्ज युग नमनीं. ३७**

त्या दोन ( असल ) शास्त्रसिद्धांताला पाहवें असी इच्छा जो मनांत धरील त्या प्रभुनें [ या ज्ञातींतील पुरुषानें ] सिद्धेश्वरास जाऊन लक्ष्मणा चार्याचें पाद द्वय नमन करण्यास रत व्हावें ( म्हणजे असल पहावयास मिळतील ). ३७

**वर्ण चतुष्टय यांत होती ज्या कन्यका चतुर्वर्णी ।**
**त्या सर्वही विवाहूं योग्य ब्राम्हण असें स्मृती वर्णी. ३८**

जगती तलावर ईश्वर निर्मित वर्ण चार ( ब्राह्मण. क्षात्रिय. वैश्य आणि शूद्र ) आहेत त्या चारीं वर्णांत कन्यका ज्या होतील त्यांसीं लग्न लाविण्यास ब्राह्मण योग्य असें शास्त्र वर्णन करितें ( वरतें संकरज कायस्थांच्या उत्पत्तिप्रकारांत पृष्ट १६७।१६८ पहा ). ३८

**त्रिः क्षत्रिया विशा द्विः शूद्राला एक परणनें युक्त ।**
**या विधिमाजि सवर्णा जी स्त्री तज्जात ती प्रजा सूक्त. ३९**

क्षत्रियानी तीन ( क्षत्रिय. वैश्य. शूद्र. ) वैश्यानें दोन [ वैश्य. शूद्र. ] शूद्राने एक [ शूद्र ] अशा वर्णाच्या स्त्रिया वरणें अनुचित नाहीं. या अशा लग्नें करून स्त्रिया केलेल्या विधींत सवर्णा [ आपल्या वर्णाची जी ] स्त्री ती पासून संततीं होईल ती शुद्ध असें ह्मटलें आहे पृष्ट १९ (पहा याज्ञवल्क्य स्मृति. आणि स्कंदादीक पुराणें आणि अनेक कविकृत ग्रंथ ). ३९

**श्रेष्ठा कनिष्ठ वर्णा स्त्री पासुनि संतती जरीं होते ।**
**अनुलोम म्हणा तीनी वर्णांत सहा प्रकार जे हो ते. ४०**

श्रेष्ठ वर्णाला कनिष्ठ वर्णाच्या स्त्री पासून संतती होते तर त्यांस " अनुलोम " म्हणावे ते तीन वर्णांत सहा प्रकार होतात. अहो ते पहा. ४०

**अनुलोम ब्राम्हणाचे तीनं पहा घेउनि क्रमें वर्णा ।**
**मूर्धावसिक्त अंबष्टः पार्षद वा निषादसेंवर्णा. ४१**

ब्राह्मणाचे अनुलोम तीन होतात ते वर्णक्रम घेऊन पहा क्षत्रिणीच्या पोटीं " मूर्धावसिक्त " वैश्येच्या पोटीं " अंबष्ट " शूद्रीच्या पोटीं " पार्षद ( पारसव ) अथवा निशाद " असे समजून बोला. [ याज्ञ० आचाराध्याय श्लोक० ९१ ]. ४१.

**राजानुलोम युग्म वणिजाज महिष्य ऊग्र शूद्रिज हो ।**
**वैश्यास एक करणचि धर्महि त्यांचा वदूं पहा द्विज हो. ४२**

क्षत्रियास अनुलोम दोन वाणिणीच्या पोटीं " माहिष्य " शूद्रीच्या पोटीं " उग्र " वैश्यास अनुलोम एक शूद्रीच्या पोटीं " करण " एकूण ६ यांचा धर्म कसा तोही द्विजहो ( प्रभुहो ) तुम्हास सांगूं. ४२ याज्ञवल्क्य स्मृति आचाराध्याय श्लोक. ९२

**पितृवर्णान्न्यूंन जननि वर्णाधिक्यास पावतो जरितो ।**
**मातामहाधिकारा लागूनि अयोग्य होतसे तरि तो. ४३**

बापाच्या वर्णाहून कमी. आईच्या वर्णाहून अधिक अशा धर्माचा होतो तरीं आईच्या बापाच्या अधिकाराला मात्र पावत नाहीं. ४३ [ या विषई वरतें सांगीतलेले स्कंद पुराणादिक आणि गागाभट्टी जातीविवेकादि ग्रंथ पहा. ]

**अनुलोम षट्क झालें आतां प्रतिलोम षट्क तें वर्णूं ।**
**त्या जाति आणि धर्मालागीं विद्वत्समूह आकर्णू ४४**

" अनुलोम " छकडी झाली आतां " प्रतिलोम " छकडी सांगू त्यांच्या जाती आणि धर्म कसे तें विद्वान मंडळी ऐको. ४४

**पुरुष कनिष्ठ श्रेष्ठा वर्णाच्या स्त्रीस अविधिनें वरितो ।**
**तज्जात संततीला देतो दोषा बळेंच कीं तरि तो. ४५**

*कनिष्ठवर्णाचा पुरुष श्रेष्ठवर्णाच्या स्त्रीस अविधिनें वरितो ( लग्न नकरितां बायको करून घेतो. ) तर. तो त्यापासून झालेल्या संततीला बळेंच नीचपण देतो. ४५

**प्रतिलोम क्षत्रियाचा सूत ह्मणा एक दोन ते वणिजा।**
**वैदेह ब्राम्हणी सुत मागध जाती म्हणाच क्षत्रिणिजा. ४६**

क्षत्रियाचा प्रतिलोम ब्राह्मणीच्या पोटीं झालेला " सूत " एकच. वाण्याचे प्रतिलोम दोन ब्राह्मणीचा " वैदेह " आणि क्षात्रिणीचा " मागध " असे म्हणा. ४६ याज्ञव० आचाराध्या० श्लो० ९३-९४.

**शूद्रा ति वाडवीचा चांडाल क्षत्रिणीज क्षत्तार।**
**वैश्यिणिजायोगवि सेंम्हणा म्हणाप्रभुस हे असत्तार. ४७**

शूद्रालाप्रतिलोमतीन. ब्राम्हणीचा " चांडाल " क्षत्रिणीचा " क्षत्तार " आणि वाणिणीचा " अयोगवी " असे म्हणा आणि जरीं हे नीच आहेत तरीं [ श्रोतेहो ] ईश्वरास ह्मणा यानां तार. ४७ या० आ० श्लोक ९३-९४.

**मातावर्णाहूनी पितृवर्ण कनिष्ठ यामुळें सां नां।**
**जितका उच्च प्रसूचा वर्ण तसा धर्म होय त्यां साना. ४८**

मातेच्या वर्णाहून पित्याचा वर्ण कमी म्हणून या सहा जणांस जीतका आईचा वर्ण उंच तीतका यांचा धर्म नीच. असा धर्म होतो. ४८

**अनुलोमांत परस्पर प्रतिलोमामाजि ही तसे झाले।**
**अनुलोमात्प्रतिलोमीं तद्व्यस्तहि होउनी रुपा आले. ४९**

अनुलोमाचे पुरुष आणि स्त्रिया यांत परस्परांत. आणि प्रतिलोमाचे पुरुष आणि स्त्रिया यांत परस्परांत. तसेच अनुलोमाच्या पुरुषापासून प्रतिलोमाच्या स्त्रियेस. आणि त्या उलट म्हणजे प्रतिलोमाच्या पुरुषापासून अनुलोमाच्या स्त्रियेस [ उदाहरण. क्षत्रिय पुरुष, वाणीणस्त्री यांपासून झालेली संतती अनुलोम असी " माहिष्य " स्त्री. आणि वाणीपुरुष, ब्राम्हणीस्त्री यापासून झालेली संतती प्रतिलोम असा " वैदेह " पुरुष. या उभयतां पासून झालेली संतती " संकरज कायस्थ " जसे ] अशा प्रकारें उत्पन्न होऊन प्रकट झाले आहेत. ४९ याज्ञव० आचारा० श्लोक ९५ असे उत्पन्न झालेल्यांत जो वरिष्ठ वर्णाच्या धर्मानें चालतो तो सातव्या आणि कनिष्ठ वर्णाच्या धर्मानें चालतो तो पांचव्या पिढीस उत्कर्ष आणि हीनत्व पावतो म्हणजे ज्या वर्णधर्मानें चालतो त्या वर्णांत मिळतो अशानें ब्राह्मणादीक यांचे सर्व उत्कर्ष पाऊन ब्राह्मणादिकांत मिळाले आहेत असा संभव आहे. याज्ञ० आचा० श्लोक ९६.

**तद्विस्तार सकलही जाति विवेकीं तसाच अन्यांत ।**
**हेमाद्रिप्रबंधींही बहु वदले सुज्ञ मान्य मान्यांत ९०**

त्याचा विस्तार जातिविवेक स्कंदपुराण गागाभट्टी शूद्रकमलाकर आदिकरून आणि हेमाद्रिप्रबंध आणि कित्येक ग्रंथांत आहे तो मोठे विद्वान मान्य अशांनीं मान्यजनांस सांगितला आहे- ९०

**विस्तर साध्वस ग्रस्ता मचेता मानलें असें कथिलें ।**
**स्वज्ञातीविषयातें मात्र सुधी तुष्टिकारणें ग्रथिलें. ९१**

तो सर्व सांगून लिहूं लागलों तर ग्रंथ विस्तार होऊन समाप्तीस वेळ लागेल. ( विद्युच्चलं जीवितं. अर्थ--जीवित जें आहे हें वीजेसारखें चंचल आहे स्थिर नाहीं ) असे भयानें माझें चित्त ग्रासिलें अशा माझ्या मनाला जें मानलें तें सांगितलें. आपल्या ज्ञातीच्या विषयास मात्र बुद्धिवंतास संतोष होण्याकरितां या ग्रंथरूप गुणां ( दोऱ्यां ) त ओविलें. ९१

**द्वितियोध्यायीं केलें आहें निर्दिष्ट नाम त्या अमृता ।**
**करवीं प्रभु ग्रंथरची सन्मतिहीं गृहण या किजे अमृता. ९२**

दुसऱ्या अध्ययांत नांव दाखविलें आहें त्या अमृताच्या हातून प्रभु ( ईश्वर ) ग्रंथ रचिता झाला. या ग्रंथरूप अमृताला सन्मति ( चांद्रसेनीय कायस्थ प्रभुकुलांत उत्तम बुद्धि स्वधर्मलालस ) जे असतील त्याहीं गृहण करावें. असी ग्रंथकर्त्याची ईश्वर आणि तद्रूप जगतांत असलेल्या जनांस विनंती आहे. ९२

**इति चांद्रसेनीय कायस्थप्रभु धर्माधिकार संग्रहे विवादोत्पत्तिकाल, धर्मदूषक विवादकजन पराजितकृति, जयपत्रप्राप्ति, अनुलोम प्रतिलोम जाति, कथनंनाम तृतीयोध्यायः**

असा " चांद्रसेनीय कायस्थ प्रभु " चे धर्म आणि अधिकाराच्या संग्रहांत विवाद उत्पन्न झाल्याचा काळ, धर्माचा द्वेष करणार विवाद करणारांस पराजय दिला, आणि जयपत्रें मिळविलीं तीं, आणि अनुलोम आणि प्रतिलोम यांच्या जातीचें कथन, केलेला ( सांगितलेला ) तीसरा अध्याय.

शुभंभवतु.

पाराशरस्मृति अध्याय ११ श्लोक.

**क्षत्रियो वापिवैश्योवाक्रियावंतौ शुचिव्रतौ ।**
**तद्गृहेषु द्विजैर्भोज्यं हव्यकव्येषुनित्यशः ॥१३॥**

अर्थ क्षत्रिय अथवा वैश्य ही वेदोक्त क्रिया करणारे असून शुद्ध व्रतें आचरणारे असतील त्यांच्या घरीं द्विज ( ब्राह्मण ) यांहीं हव्य ( यज्ञकर्मांत ) कव्य [ श्राद्धादिकांत ] आणि नित्यही भोजन करावें. १३

**घृतं तैलं तथाक्षीरं गुडं तैलेन पाचितं ।**
**गत्वानदीतटे विप्रो भुंजीयाच्छूद्रभोजनं ॥१४॥**

घृत [ तूप ] तेल तसेंच क्षीर ( दुध ) गुळ आणि तेलानें तळलेलें शूद्राच्या घरचें अन्न नदीकिनाऱ्यावर जाऊन ब्राह्मणानी खावें. १४

या ग्रंथाचें पृष्ट ९७ याजवर अतिथि विषींचे श्लोक अंक लिहून दर्शित केले आहेत पाराशर स्मृति अध्याय १ **चतुर्णामपि वर्णानामाचारो धर्मपालकः ३६**

चारीही वर्णांचा आचार जो तो धर्माचें पालन कर्ता आहे. ३६

**आचारभ्रष्ट देहानां भवेद्धर्म पराङ्मुखः**
**षट्कर्माभिरतो नित्यं देवतातिथि पूजकः ॥३७॥**

जे देह आचारभ्रष्ट आहेत त्यांचा धर्म त्यांच्याकडे पाठ करितो साहा कर्मास नित्य जो रत असतो जो देवाचें आणि अतिथीचें पूजन कर्ता. ३७

**हुतशेषं तुभुंजानो ब्राम्हणो नावसीदति ।**
**संध्या स्नानं जपोहोमः स्वाध्यायो देवतार्चनं ३८**
**वैश्वदे वातिथेयश्चषट्कर्माणिदिनेदिने** अर्थ जो होम देऊन शेष राहिलेलें अन्न भक्षण करता ब्राह्मण असतो तो वाईट गतीस जातनाहीं संध्या स्नान आदिकरून विषय पृष्ट ९७ पहा.

**प्रियो वा यदिवा द्वेष्यो मूर्खः पंडित एव वा ३९ वैश्वदेवे तु संप्राप्तः सोऽतिथिः स्वर्ग संक्रमः** अर्थ आपल्यासीं प्रीति किंवा द्वेष ठेवणारा किंवा मूर्ख अथवा पंडीत [ वेदशास्त्रें पुराणें जाणता ] वैश्वदेव करून अतिथी पाहण्याच्या वेळेस जो कोणी प्राप्त होयील ( आपल्याला अन्न मिळावें असी इच्छा ठेवणारा मिळेल ) तो अतिथी स्वर्गमार्ग देणारा

**दूराद्धानं पथिश्रांतं वैश्वदेवे उपस्थित ॥४०॥ अतिथिं तं विजानीयान्नातिथिः पूर्व मागतः** अर्थ दूरून चालता रस्त्यानी थकून वैश्वदेवाच्या वेळेस येऊन उभा राहील त्यास अतिथी ह्मणावा पूर्वीच आपल्या घरीं येऊन राहिलेला असेल तो अतिथी नव्हे.

**नपृच्छेद्गोत्र चरणं न स्वाध्याय व्रतानि च ॥ ४१ ॥ हृदये कल्पयेत्तस्मिन्सर्वदेवमयो हि सः** अर्थ तुझें गोत्र नाम आचरण वेदम्हटले आहेस व्रतें ( महाव्रत महानाम्निव्रतै उपनिषद्व्रत गोदानव्रत ) केलीं आहेस हें कांहींही न विचारितां सर्वदेवरूप हाच आहे असी त्याच्याठायीं भावना हृदयांत ठेवून [ पूजावा भोजन द्यावें. ] **नैकग्रामीणमतिथि विप्रं सांगमिकं तथा ॥ ४२ ॥ अनित्यंह्यागतो यस्मात्तस्मादतिथिरुच्यते अर्थ.** एकच गावांत नेहमी राहणारा भिक्षुक अतिथि नव्हे आपल्या बरोबरचा ही तसाच एकाएकीं आला असा जो तो आकस्मात् आल्यामुळें त्यास अतिथि ह्मणतात.

**अपूर्व सुव्रती विप्रो अपूर्वो वातिथिस्तथा ॥ ४३ ॥ वेदाभ्यास रतो नित्यंत्रयो ऽपूर्वो दिने दिने. ॥** अर्थ. उत्तम ब्राह्मणपणाचीं व्रतें ठेवणारा अपूर्व. तसाच अतिथि अपूर्व. नित्य वेदाभ्यास करणारा अपूर्व. हे प्रतिदिवसीं तीनही अपूर्व होत. **वैश्वदेवेतु संप्राप्ते भिक्षुके गृहमागते ॥ ४४ ॥ उधृत्य वैश्वदेवार्थं भिक्षां दत्वा विसर्जयेत्.** अर्थ. वैश्वदेवाच्या वेळेस भिक्षुक घरास आला तर वैश्वदेव आटोपतांच भिक्षा देऊन कर्म समाप्त करावें. **यती च ब्रम्हचारी च पक्वान्नं स्वामिना वुभौ ॥ ४५ ॥ तयोरन्नमदत्वा च भुत्का चांद्रायणं चरेत्.** अर्थ. यती आणि ब्रम्हचारी यांस पक्व झालेलें अन्न न देऊन घरकऱ्यानी खाललें तर चांद्रायण नावाचें प्रायश्चित्त केलें पाहिजे. **यतिहस्तेजलंदद्याद्भैक्ष्यंदद्यात्पुनर्जलं ॥ ४६ ॥ तद्भैक्ष्यंमेरुणातुल्यंतज्जलंसागरोपमं.** अर्थ. यतिच्या हातावर पाणीं घालून. ( आचमन देवून ) भैक्ष्य ( खाण्याचें अन्न ) देवून पुनः पाणी दिलें तर तें अन्न मेरु बरोबर आणि तें पाणी समुद्रा बरोबर असें आहे. **वैश्वदेविकृतान्दोषान्शक्तो भिक्षुर्व्यपोहितुं ॥ ४७ ॥ नहि भिक्षु कृतान्दोषान्वैश्वदेवी व्यपोहति.** अर्थ. वैश्वदेव कर्त्याचे केलेले दोष भिक्षु नाशास पाऊं शकतो. भिक्षुचे केलेले दोष वैश्वदेवकर्ता नाशूं शकत नाहीं. **अकृत्वा वैश्वदेवं तु भुंजंते ये द्विजातयः ॥ ४८ ॥ सर्वे ते निष्फला ज्ञेयाः पतंति नरकेऽशुचौ.** अर्थ. द्विजाती ( ब्राम्हण क्षत्रिय आणि वैश्य ) जे वैश्वदेव न करून अन्न भक्षण करितात त्यांचें सर्व कृत्य निर्फल समजलें पाहिजे ते मळीन नरकांत पडतात. **यतये कांचनं दत्वा तांबूलं ब्रह्मचारिणे ॥ ५० ॥ चोरेभ्योऽप्यभयं दत्वा दातापि नरकं व्रजेत्.** अर्थ. यतीला ( संन्याशाला ) सोनें देवून

ब्रह्मचारी ( उपनयन झाल्यावर समावर्तन झालें नाहीं तों पावेतों चा जो आचार तो आचरित असलेला ) यास विडा आणि चोराला अभय देणारा हा नरकास जातो. **पापो वा यदि चाण्डालो विप्रघ्नः पितृघातकः ॥ ९१ ॥ वैश्वदेवे तु संप्राप्तः सोऽतिथिः स्वर्ग संक्रमः** अर्थ. जरी पातकी अथवा चांडाल. किंवा ब्रम्हत्या कर्ता किंवा पितृघातक असेल तरी वैश्वदेवाच्या वेळेस दिसेल तर तोच अतिथि स्वर्गमार्ग क्रमविता समजावा. **अतिथिर्यस्य भग्नाशो गृहात्प्रति निवर्तते ॥ ९२ ॥ पितरस्तस्य नाश्नाति दशवर्ष शतानिच.** अर्थ. अतिथि ज्याच्या घरून अन्न न मिळतां निराश होऊन परत जाईल त्याचें दिलेलें अन्न पितर हजार वर्षे पर्यंत खाणार नाहींत. **न प्रसज्यति गो विप्रोह्यतिथिं वेदपारगं ॥ ९३ ॥ अददन्नान्न मात्रंतु भुक्त्वा भुंक्तेतु किल्बिषं.** अर्थ. जो गाई विप्र अतिथी आणि ब्राह्मण यांस अन्न नदेतां भक्षण करितो तो चिरकाल पातक भोगितो. अध्याय ८ श्लोक. **गायत्री रहितो विप्रः शूद्रादप्यशुचिर्भवेत् ॥ गायत्री ब्रह्म तत्वज्ञाः संपूज्यंते द्विजोत्तमाः** अर्थ. ब्राह्मण कुलांत उत्पन्न झालेला गायत्री जपानुष्ठाना विना राहतो तो शूद्राहून ही मलीन होतो गायत्री आणि ब्रम्ह ( वेद ) तत्व जाणता जो तो उत्तम, तो पूजा घेण्यास योग्य होय. अध्याय १२ श्लोक. **कुशपूतं तु यत्स्नानं कुशेनोपस्पृशेद्द्विजः । कुशेनोधृत तोयंयत् सोमपान समंस्मृतम् ॥ २८ ॥** स्नान दर्भहातीं घेऊन केलें तर तें शुद्ध, जलस्पर्श जो ब्राम्हण क्षत्रिय वैश्य दर्भ हातीं घेऊन करितो दर्भहस्तच जो जल आणितो तें जलपान सोमपान समजलें पाहिजे. २८ **अग्निकार्यात्परिभ्रष्टाः संध्योपासन वर्जिताः ॥ वेदंचैवानधीयानाः सर्वे ते वृषला स्मृताः** अर्थ अग्निकार्य ( अग्निहोत्र वैश्वदेव ) यांस टाकिलेले संध्या जप वर्ज केलेले आणि वेदाध्ययन [ ब्रह्मयज्ञ न केलेले ते सर्व ( तीनहीवर्ण ) वृषलाः ( वृष म्हणजे धर्म त्याचें लान म्हणजे त्याग केला आहे ते ) असे समजतात.

समाप्त.